





नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

## अनुक्रमणिका



---

**प्रकाशन :** **त्रैमासिक** (जानेवारी, एप्रिल, जुलै, ऑक्टोबर)
**संपादन - समिती :** मृणालिनी शहा (प्रमुख), अशोक रा. केळकर, गं. ना. जोगळेकर, मॅक्सीन बर्नसन, प्र. ना. परांजपे, द. दि. पुंडे, आशा मुंडले, अंजली सोमण, विजया देव, नीलिमा गुंडी
**संपादकीय संपर्क व परीक्षणार्थ पुस्तके :** मृणालिनी शहा, १, शीतल अपार्टमेंट, ४६/४, एरंडवणे, पुणे ४११ ००४. दू. क्र. ५४३३८६९
pravinshah@ip.eth.net
**व्यवस्थापकीय संपर्क व पैशांचा भरणा :** नीलिमा गुंडी, ३. अन्नपूर्णा, १२५९, शुक्रवार पेठ, सुभाषनगर गल्ली क्र. ५, वाडिया हॉस्पिटलसमोर, पुणे ४११ ००२. दू. क्र. ४४८६०१५
**पत्रिकेची वर्गणी, जाहिरातीचे दर :** आवरणपृष्ठ तीन पहा.

**सूचना :** पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांच्या / लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच, असं नाही.

या अंकाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे अंशतः अनुदान मिळालेले आहे. तथापि या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी मंडळ व राज्यशासन सहमत असेलच असे नाही.

---

**संपादक :** मृणालिनी शहा.
**प्रकाशक व मुद्रक :** मराठी अभ्यास परिषदेसाठी नीलिमा गुंडी
**मुद्रण स्थळ :** पद्मरेखा आर्ट्स, १९४/२, नवी पेठ, पुणे ४११ ०३०.








संपादकीय

# काळ आणि भाषा : एक चकवा

पृथ्वीतलावरची काळाची गती भाषेला खरे तर अगदी चक्रावूनच टाकते. आपल्याला माहीतच आहे की ग्रिनिच येथे गुरुवारचे दुपारचे बारा वाजले असता १८०° रेखावृत्ताच्या पूर्वेला गुरुवारास प्रारंभ होणार असतो आणि त्याच रेखावृत्ताच्या पश्चिमेला गुरुवार संपलेला असतो! अर्थात आपला व्यावहारिक गोंधळ टाळण्यासाठी १८०° रेखावृत्त ओलांडल्यावर लगेच जी मध्यरात्र येईल, त्यावेळी वार व तारीख यात बदल करतात. त्यामुळे पूर्वेकडे जाणाऱ्या जहाजांना एकच वार दोनदा मोजावा लागतो आणि पश्चिमेकडे जाणाऱ्या जहाजांना मधला वार सोडून द्यावा लागतो. असो!

लहान मुले काळाची गल्लत करीत म्हणत असतात. 'मी उद्या गेले', 'मी काल जाईन', तेव्हा आपल्याला हसू येतं; पण प्रत्यक्षात अगदी खरं बोलायचं तर पृथ्वी-प्रदक्षिणा करताना कोणालाही अशाच भाषेत बोलावे लागेल - नाही काय?

आपण चित्र काढल्यावर ते रंगविण्यापूर्वी जसा पांढऱ्या रंगाचा हात फिरवतो, तसा काळ आपल्या जगण्याला व्यापून असतो. तो सदैव असतोच. मात्र त्याची नाना विलसिते आपल्याला भाषेत नेमकी पकडता येत नाहीत. आपल्यासारख्यांना जाणवतो तो ढोबळ स्वरूपाचा काळ — भूत, वर्तमान आणि भविष्य म्हणजेच काल, आज आणि उद्या अशा तीन कप्प्यांत विभागता येणारा! पण काळ म्हणजे काय कपाटाचे तीन कप्पे थोडेच असतात? आपल्या तोंडून शब्द उच्चारून बाहेर पडेपर्यंत वर्तमानक्षण कुठे थांबायला तयार असतो? काळाच्या मागे धावताना भाषा अगदीच कमी पडते!

क्षण हा एकाच वेळी क्षणजीवीही असतो आणि चिरंतनाच्या साखळीतला दुवाही असतो. त्यामुळे काही व्याकरणकार दोन काळांची रसायने तयार करतात. उदाहरणार्थ, 'भविष्यभूतकाळ'! तुमच्या-आमच्या मनातल्या अनेक अपूर्ण संकल्पांसाठी हा काळ अचूक उपयोगी पडतो. (उदा. मी रोज पहाटे पर्वती चढणार होते.) पण ही रसायने तरी कुठे पुरी पडतात? उदाहरणार्थ, नव्याने पोहताना

घाबरून 'मी मेलो, मेलो,' म्हणून ओरडणारा मुलगा कोणत्या काळात बोलत असतो? तो एक प्रकारे असतो 'भासमान भविष्यकाळ' आणि रूप मात्र असते भूतकाळाचे! दैनंदिन व्यवहारात अशा प्रकारचे अनुभव पदोपदी येतात.

श्रेष्ठ साहित्यिकांचे काळाशी अप्रत्यक्षपणे भांडणच चालू असते. साहित्यिक (किंबहुना सर्वच कलावंत) मंडळींना काळाचा पायरव सतत ऐकू येत असतो. काळाचे सातत्य त्यांना एकसंधपणे जाणवत असते. सर्वभक्षी काळावर आपल्या सर्वसाक्षी लेखणीने विजय मिळविण्याचे आव्हान त्यांच्यासमोर असते. त्यासाठी त्यांच्या लेखणीकडे त्रिकालदर्शित्व असावे लागते.

काळ ही वास्तवाची एक मिती असते. कलाकृतीत स्वतंत्र वास्तवाची निर्मिती असल्यामुळे तेथील काळ हादेखील वेगळ्या पातळीवरचा असतो. कलाकृतीत एकाचवेळी अनेक काळांचा वावरही असू शकतो. दृश्य कलांमध्ये त्यांच्या अभिव्यक्तीला वावही असतो. भाषेचा व्यवहार मात्र एकरेषीय पद्धतीने होत असल्यामुळे साहित्यात तसा वाव नसतो. त्यासाठी वेगळ्या क्लृप्त्या योजल्या जातात. त्या अशा – कधी ... अशा टिंबांचा वापर करून काळाची बदलती गती दाखवणे, कधी तिरपा ठसा वापरणे, इत्यादी.

भावकवितेत काळाचा अनुभव शब्दांकित करता येणे, हे एक आव्हानच असते. वर्तमान क्षण (न गोठू देता) साऱ्या स्पंदनांसकट शब्दांकित करणे, ही गोष्ट साधीसुधी नसते. व्याकरणिक चौकटीतील काळाची रूपे हा प्रत्यय देण्यास अनेकदा असमर्थ ठरतात.

व्याकरणात गृहीत नसलेला असा एक काळ भावकवितेत साकारलेला आहे, असे मानले जाते. तो काळ असतो – 'कालातीत वर्तमानकाळ.' इंदिरा संतांच्या कविता वाचताना याचा प्रत्यय येतो.

काव्यात्म दृष्टीने अनुभव व्यक्त करणाऱ्या दुर्गा भागवतांच्या काही ललित लेखांमध्येही आपल्याला अशा जागा आढळतात. त्यांच्या 'डोंगरमाथ्यावर' या लेखात त्या एके ठिकाणी काळाच्या अनंतत्वाचा साक्षात अनुभव शब्दांमधून किती समर्थपणे देतात! स्मशानाच्या सान्निध्यात बसून त्या अनुभवतात ते असे : "प्रत्येक क्षण अमर? हा कसला भास मला होतो आहे? आज स्वप्नातले स्वप्न मला पडते आहे. क्षणाच्या बीजात अमर जीवनांकुर फुटताना मी पाहते आहे. शिळेशिळेत फटा पडल्या आहेत. मूर्ती भग्न होताहेत. वाघळे घिरट्या घालताहेत. सांगाडे झडताहेत. पण त्यातूनही धुमारे फुटणार आहेत. कारण बियांच्या कुशी फुटताहेत

आणि उन्हा-पावसाचे खेळ सुरू होताहेत. दूरची पाने या स्मशानातही वारा आणून टाकतो. त्या पानांतला प्राण कुठे जाईल?"[1]

हे शब्द वाचताना नित्यनूतन अशा वर्तमानकाळाचाच प्रत्यय वाचकाला येतो.

एखाद्या कलावंताला काळ एकाच वेळी स्थूल आणि सूक्ष्म अशा दोन्ही रूपांमध्ये जाणवतो. तो असा - आपल्या जगण्याला लपेटलेला अनादि-अनंत काळ आणि आपल्या हृदयाच्या स्पंदनात सामावलेला त्रुटित काळ! शान्ता शेळके एका कवितेत लिहितात -

"हाती हात आहेत, तरी उरात खोल एकलेपण
टवकारून बघतो काळ, संथ सरकणारे क्षण."[2]

काळाला असे नेमकेपणाने शब्दांकित करण्याचे सामर्थ्य फार थोड्या जणांमध्ये असते. आपल्यासारखे लोक 'काल, आज, उद्या' या चाकोरीशीच येऊन थांबतात. त्याच्यापुढे जाऊन 'परवा' म्हटलं की ऐकणाऱ्याला प्रश्न पडतो — भूतकाळ की भविष्यकाळ?

काळ पकडायला भाषा अशी तोकडी पडते!

**संदर्भ :**

१. भागवत दुर्गा, "डोंगरमाथ्यावर", 'पैस', मौज, मुंबई १९७३, पृ. ११०
२. शेळके शांता, "शेवट" 'जन्मजान्हवी', सुरेश एजन्सी, पुणे, १९९०, पृ. ७

■

**नीलिमा गुंडी**

## परिषद वार्ता

कळवायला आनंद वाटतो की फादर फ्रान्सिस दिबिटो यांचा **भाषा आणि जीवन** १०:४ दिवाळी १९९२ (हा लोकशिक्षण विशेषांकाचा पूर्वार्ध होता.) मध्ये प्रकाशित झालेला 'येशूची लोकशिक्षणाची शैली' हा लेख पुणे विद्यापीठाच्या द्वितीय वर्ष विज्ञानाच्या विद्यार्थ्यांना अभ्यासासाठी नेमला आहे.

■





अनुक्रमणिका

# संस्कृतमधील भावे प्रयोग - एक निरीक्षण

मल्हार कुळकर्णी

संस्कृतमध्ये तीन प्रकारचे प्रयोग संभवतात, असे आपणाला माहीत असते. कर्तरी, कर्मणी आणि भावे. पारंपरिक शब्दावलीत बोलायचं, तर कर्तृवाच्य, कर्मवाच्य आणि भाववाच्य.

कर्तरी अथवा कर्तृवाच्य प्रयोगात कर्त्याप्रमाणे क्रियापद चालते, कर्त्याची प्रथमा, कर्माची द्वितीया विभक्ती होते. कर्मणी अथवा कर्मवाच्य प्रयोगात कर्माप्रमाणे क्रियापद चालते. कर्माची प्रथमा आणि कर्त्याची तृतीया विभक्ती होते. भावे किंवा भाववाच्य प्रयोगात तिङन्त क्रियापद नेहमी तृतीयपुरुषाच्या एकवचनात आणि कृदन्त क्रियापद नेहमी नपुंसकलिंगी प्रथमा एकवचनात असते. असे सारे व्याकरणकार आपल्याला सांगतांना दिसतात. सिद्धान्तकौमुदी (सिकौ) सुद्धा म्हणते -

भावो भावना उत्पादना क्रिया ।
सा च धातुत्वेन सकलधातुवाच्या भावार्थकलकारेण अनूद्यते ।
युष्मदस्मद्भ्यां सामानाधिकरण्याभावात्प्रथमपुरुषः
तिङ्वाच्यभावनाया असत्त्वरूपत्वेन द्वित्वाद्यप्रतीतेर्न द्विवचनादि ।
किं त्वेकवचनमेव । तस्यौत्सर्गिकत्वेन संख्यानपेक्षत्वात् ।

या प्रतिपादनाचा भावार्थ असा की -

भाव म्हणजे भावना. म्हणजे उत्पन्न होणे ही क्रिया! आणि ती, म्हणजे क्रिया, जी कुठल्याही धातूपासून कळून येत असते. तिचा अनुवाद भाव या अर्थी सांगितलेल्या लकाराने केला जातो. युष्मद् आणि अस्मद् यांच्याशी भाव समानाधिकरण नसल्याने "शेषे प्रथमः" या सूत्रानुसार प्रथमपुरुष केला जातो. तिङ् प्रत्ययाने कळून येणारी क्रिया सत्त्वरूप नसल्यामुळे द्वित्व इ. कळून येत नसल्यामुळे द्विवचन, बहुवचनाचे प्रत्यय धातूला लावले जात नाहीत; तर केवळ एकवचनाचेच प्रत्यय धातूला लावले जातात; कारण ते सर्वत्र प्राप्त आणि दुसऱ्या कुठल्याही संख्येची अपेक्षा नसणारे आहेत.

'भावकृतां प्रयोगसाधुत्वमात्रार्थकता' असे म्हणून व्युत्पत्तिवादही कृदन्तात नपुं. प्र.ए.व. वापरावे अशा मताला पुष्टी देतो.

या पार्श्वभूमीवर आता आपण पुढील दोन प्रयोग अभ्यासू -

i) उष्ट्रासिका आस्यन्ते । हे वाक्य पूर्ण लिहायचे झाल्यास 'बालकैः उष्ट्रासिका आस्यन्ते' ।[१] असे म्हणावे लागते. "पर्यायार्हणोत्पत्तिषु ण्वुच् ।" या सूत्राने प्रत्यय लागून आसिका शब्द बनतो. याचा अर्थ अनेक उंट निरनिराळ्या तऱ्हेने जसे बसतात, त्याप्रमाणे त्या बालकांची निरनिराळी उपवेशने आहेत.

ii) हतशायिकाः शय्यन्ते । ह्याचे पूर्ण वाक्य 'हतशायिकाः शय्यन्ते भूकम्पे नरैः' असे आहे. त्याचा अर्थ मेलेले प्राणी जसे अस्ताव्यस्त पडलेले निजलेले असतात, तसे भूकंप झाला तेथील लोकांची वाटेल तशी निजणी असतात.

(उष्ट्राणां हि आसिकाः स्वरूपतः एव विलक्षणाः । हताश्च नानाप्रकारं शेरते उत्तानाः अवतानाः विकीर्णकेशाः तिस्रश्चतस्रश्च । तत्र यादृशानि हतानां शयनानि तादृशानि देवदत्तादिभिः क्रियन्ते इत्यर्थः ।)

हे दोन्ही वाक्यप्रयोग स्वतः व्याकरणमहाभाष्यकारांनी केले आहेत आणि ह्या दोन्ही प्रयोगांत तिङ् प्रत्ययाचा अर्थ विशेष म्हणजे वेगवेगळे भाव असताना बहुवचन वापरलेले दिसते, असे म्हटले आहे. तसेच, तिङभिहिते चापि भावे तदा बहुवचनं श्रूयते । असे म्हटले आहे.

वरील दोन्ही प्रयोगांकडे दृष्टिक्षेप केल्यास असे दिसून येते की -

उष्ट्रासिका याचा अर्थ - उंटांची (वेगवेगळ्या प्रकारची) बसण्याची क्रिया आणि हतशायिका याचा अर्थ मेलेल्यांची (वेगवेगळ्या प्रकारची) निजण्याची क्रिया. वर दिलेल्या अर्थांच्या बाबत असे म्हणावे लागते की - उष्ट्रासिका हे उपमान असून आस्यन्ते मधील आस् धातुद्वारा बोधित जी बसण्याची क्रिया, ते उपमेय आहे आणि मग उंटांच्या बसण्याच्या ज्या अनेक क्रिया त्याप्रमाणे मुलांच्या बसण्याचे अनेक प्रकार असा अर्थ वक्त्याला ठसवायचा असल्याने, म्हणजे क्रियांचे अनेक प्रकारत्व दाखवायचे असल्यामुळे आस्यन्ते येथे बहुवचनाचा प्रयोग करता येतो. तीच गत 'हतशायिकाः शय्यन्ते ।' ह्या प्रयोगाचीही होते.

मात्र इथे लक्षात घेतले पाहिजे की, अशा प्रकारचा अर्थविशेष अभिप्रेत

असतानाच असे प्रयोग झाले आहेत. म्हणजे उपमानोपमेयभाव[२] इ. विशेष प्रयोजनच ह्या प्रयोगांचे कारण आहे.

आणि म्हणून भाष्यकारांच्या एकंदर प्रतिपादनाचा सारांश करताना कैयट म्हणतो - "एवं तु विवक्षान्तरे भवत्येवेति भाष्यकारेण भावेऽपि लविधाने बहुवचनमुपपादितम् ।"

भाष्यकारांच्या ह्या वचनाचे अधिक स्पष्टीकरण करायचे तर असे म्हणावे लागते की, धातूत्तर तिङ् प्रत्ययाचा अर्थ असलेली जी क्रिया, तिच्यात स्वरूपतः जरी वेगळेपणा नसला तरी ती क्रिया 'उष्ट्रासिकाः' आणि 'हतशायिकाः' ह्या क्रियांशी समानाधिकरण असल्याने आणि क्रियांच्या प्रकारचे ज्ञान होण्याला इतर साधन नसल्याने ते कळवून देण्यासाठी बहुवचनाचा प्रयोग उपपन्न होतो, असे मानावे लागते. शिवाय इव शब्दाचा प्रयोग नसतानाही त्याचा अर्थ कळून येतो, हे मानावे लागते. (इवशब्दप्रयोगमन्तरेणापि चेवार्थगतिर्भवति।)

मग 'भवद्भिरास्यते ।[३] या ठिकाणी बहुवचन का होत नाही, या शंकेला इथे क्रियांमधील प्रकार कळवून द्यावचे नसल्याने बहुवचनाची अपेक्षाच उरत नाही, असे उत्तर दिले जाते.

अर्थात या उत्तरात, पुन्हा तशी अपेक्षा असेल तर बहुवचनी प्रयोगसुद्धा करता येईल, हा विचार सूक्ष्मपणे व्यक्त झाला आहे, हे मान्यच करावे लागते.

महाभाष्यकारांच्या ह्या दोन प्रयोगांचे स्पष्टीकरण कसे करावयाचे याविषयी वैयाकरणनिकायात अनेक मते दिसून येतात.

वाक्यपदीयकार भर्तृहरीने प्रस्तुतच्या वचनवादात न शिरता, भाष्यकारांच्या वरील दोन वचनांचा संदर्भ दिला आहे, शब्द, क्रियेचा जातिभाग कळवून देतात की व्यक्तिभाग, या प्रश्नाच्या ऊहापोहाच्या प्रसंगी! आणि निर्णय असा दिला आहे की 'उष्ट्रासिका' आणि 'हतशायिका ...' या वाक्यांमध्ये शब्दाने क्रियेचा जातिभाग - सामान्यभागच कळवून दिला जातो. म्हणून टीकाकार म्हणतो - "उष्ट्रासिका आस्यन्ते हतशायिकाः शय्यन्ते इत्यादौ तेषु क्रियासंबन्धतो जातिभागस्य प्रक्रमे सामान्येनैवापर्यालोचितदेशकालसाधनतया प्रक्रमे च शब्दात्मा शब्दस्वरूपं न भिद्यते साधनसंबन्धकृतस्तत्र भेदो न प्रथत इति यावत् ।" वा.प. २.४५८

कैयट आणि हरदत्त यांनी परंपरेतील प्रस्तुत संदर्भातील एक मत 'केचित्'







असे म्हणून उद्धृत केले आहे आणि उष्ट्रासिका, हतशायिका या भाववाचक कृदन्तांना 'अकर्मकधातुभिर्योगे देशः कालः भावः गन्तव्योऽध्वा च कर्मसंज्ञक इति वाच्यम् ।' या वार्त्तिकाने कर्मसंज्ञा झाली आणि कर्मणि लकार असल्याने ही भाववाचक कर्मे प्रथमा बहुवचनात आली, असे म्हटले आहे.

तथापि परंपरेने या मतावर जोरदार हल्ला चढवतांना अस् धातु अकर्मक असल्याने त्यावरून कर्मणि लकार होईलच कसा असा आक्षेप घेतला आहे. धातूनामनेकार्थत्व मानावे तर पूर्ण वाक्याचा अर्थ बदलतो.

प्रौढमनोरमेने हा भावे प्रयोग असल्याचे मान्य करून 'आसिकाः शायिकाः' हे द्वितीयान्त शब्द असल्याचे म्हटले आहे. 'क्रियाविशेषणांना कर्मत्वं द्वितीया च' या सामान्य नियमानुसार ही द्वितीया झाली.

अर्थात या मतावरही आक्षेप आहेतच. त्यांचा प्रतिवाद करण्याचा प्रयत्नही प्रौ.म.ने केला आहे.

तत्त्वबोधिनी या टीकेत प्रस्तुत संदर्भातील आणखी एका मताचा उल्लेख केला आहे. काहीजण उष्ट्रासिका हतशायिका या शब्दांमध्ये सदृशलक्षणा स्वीकारून उष्ट्रासिकासदृश, हतशायिकासदृश असा अर्थ प्राप्त करून ते, आस्यन्ते, शय्यन्ते ह्या क्रियापदांच्या अर्थाशी अभेद संबंधाने अन्वित होतात, असे मानतात. तथापि आसिका इ. शब्दांची विभक्ती काय हा प्रश्न अनुत्तरितच रहातो.

वरील सर्व मतांकडे दृष्टिक्षेप केल्यास असे दिसून येते की 'आसिकाः आणि शायिकाः' ह्या शब्दांच्या विभक्तिविषयी मतभिन्नता आढळते. प्रस्तुत प्रयोग कर्मणी तर मानता येत नाही म्हणून प्रथमेचा प्रश्न निकालात निघतो. त्यातल्यात्यात प्रौढमनोरमेचा मार्ग सुसंगतीच्या अधिक जवळचा वाटतो.[४]

एकंदरीत पाहता उपमानोपमेयभाव वा तत्सदृश कारणांमुळे क्रियेचा स्वरूपगत भेद दाखविणे वक्त्याला अभिप्रेत असेल तेव्हा भावे प्रयोगातही क्रियापदाचे बहुवचनी रूप वापरता येते असा निष्कर्ष आपणाला काढता येईल. तथापि याच वेळी आपणाला टीकाकारानी दिलेली सूचनाही लक्षात घ्यावी लागेल ती म्हणजे - शब्दशक्तिस्वाभाव्यात् उष्ट्रासिका आस्यन्ते इत्यादौ क्वचिदेव भेदप्रतीतिः न सर्वत्र ।

किंबहुना असे प्रयोग विरळाच. नाहीच म्हणा ना. म्हणूनच नागेश आपल्या वै. सि. मञ्जूषेत तिङर्थविचाराच्या अंती म्हणतो -

उष्ट्रासिका आस्यन्ते हतशायिकाः शय्यन्त
इत्यत्र सार्वधातुके यक् इति सूत्रस्थभाष्यप्रयोगात्
एव बहुवचनं साध्विति वदन्ति ।

**संदर्भ टिपा -**

१) काही टीकाकारांनी 'उष्ट्रासिका आस्यन्ते यवनैः ।' असे म्हटले आहे आणि त्याचा अर्थ उष्ट्रकर्तृकासनसदृशानि यवनकर्तृकाण्यासनानि इत्यर्थः । असा दिला आहे.

२) कारण उपमान आणि उपमेय समान विभक्तीत आणि समान वचनात असावेत, असा नियम आहे. (उपमानोपमेययोः समानविभक्तिकत्वसमान-वचनकत्वयोरौचित्यादिति भावः ।)

३) भवद्भिरास्यत इत्यत्र त्वाश्रयभेदादाश्रितभेदस्य प्रतिपन्नत्वात् प्रयोजनाभावात् भावो भेदं नोपदत्त इत्येकवचनमेव भवति। कैयट)

४) एका टीकाकाराने, प्रस्तुत वाक्यात कर्मणि प्रयोग मानतांना अत्यंत वेगळा अर्थ दिला आहे तो म्हणतो,

यावन्तं कालं गोदोहस्तावन्तं कालं स्वपिति
इत्यर्थे गोदोहस्य भावतया कर्मत्वात् तस्मिन्
लकारे गोदोहः सुप्यत इति भवति । तथा यावन्तं कालमुष्ट्रा आसते तावन्तं कालं
देवदत्तादय आसत इत्यर्थे उष्ट्रासिका आस्यन्त इत भवतीत्यर्थः ।

म्हणजे जसं, जेवढा काळ गाईचं दोहन आहे तेवढा काळ झोपतो या अर्थी गोदोह ही क्रिया असल्यामुळे वरील वार्त्तिकानुसार कर्मसंज्ञक होऊन ल चा कर्म अर्थ असतांना "गोदोहः सुप्यते ।" असं वाक्य होतं, तसं जेवढा काळ उंट बसतात तेवढा काळ देवदत्तादी बसतात या अर्थी उष्ट्रासिका आस्यन्ते हा प्रयोग होतो.

अर्थात हा अर्थ प्रस्तुत संदर्भाचे स्पष्टीकरण मुळीच करत नाही हे स्पष्टच आहे.

■

**संस्कृत प्राकृत भाषा विभाग, पुणे विद्यापीठ, पुणे - ७.**

# विज्ञानशिक्षणतज्ज्ञ : प्रा. वि. गो. कुलकर्णी

म. ना. गोगटे

माझे मित्र, एक नामवंत विज्ञानशिक्षणतज्ज्ञ आणि मराठी-भाषा-प्रेमी प्रा. विनायक गोपाळ कुलकर्णी (= विगो) यांचे मुंबईत १३ जुलै २००२ रोजी निधन झाले. त्यांना आदरांजली म्हणून त्यांच्या कार्याचा एक मागोवा येथे घेतला आहे. काही प्रकाशित लेखन व काही आठवणी यांवर हा लेख आधारित आहे.

विगोंचा जन्म बेळगाव येथे ४ सप्टेंबर १९३२ रोजी झाला. शिक्षण बेळगाव, रत्नागिरी, धारवाड व मुंबई येथे एम.एस्सी.पर्यंत झाले. १९५३ मध्ये मुंबईच्या टाटा इन्स्टिट्यूट ऑफ फंडामेंटल रिसर्च (= टाटारिसर्च) मध्ये संशोधक म्हणून ते दाखल झाले. १९७४ पर्यंत ते मूलकणांच्या संशोधनात मग्न होते. काही सहकाऱ्यांसमवेत त्यांचे ५० संशोधननिबंध विविध नियतकालिकांत प्रसिद्ध झाले. वानगीदाखल पुढे तीन निबंधांची शीर्षके दिली आहेत.

The Study of Life-times of positronium in Taflon irradiated by gamma rays.

(Physics Letters 16, 40, 1965)

Formation and quenching of ortho-positronium in molecular materials.

(Proceedings Indian Academy of Sciences 69A. 48. 1969)

Positron annihilation in liquids.

(Indian Journal of Pure and Applied Physics 9. 1008. 1971)

संशोधनानिमित्त त्यांनी युरोप व अमेरिका येथे भेटी दिल्या. असे हे अभ्यासू वैज्ञानिक मला भेटण्याची एरव्ही शक्यता नव्हती. माझा व्यवसाय अगदी वेगळा, स्ट्रक्चरल इंजिनिअरचा. पण विविध क्षेत्रातील वैज्ञानिक आणि विज्ञानप्रेमी यांना एकत्र आणणारी मराठी विज्ञान परिषद १९६६ मध्ये निर्माण झाली. परिषदेने पहिले मराठी विज्ञान संमेलन मुंबईत डिसेंबर १९६६ मध्ये भरवले. त्यावेळी विगोंची व माझी प्रथम भेट झाली. एका परिसंवादात विगो म्हणाले -

"विज्ञान वाङ्मय हे शास्त्रीयदृष्ट्या बिनचूक असले पाहिजे. तसे नसेल तर त्यातील लालित्य व्यर्थ आहे. ढोबळ विधाने अक्षम्य मानली पाहिजेत. विज्ञानदृष्टी ठेवून लेख लिहिले नाहीत तर त्या लिखाणाचा वाईटच परिणाम होईल. विद्यार्थ्यांना शास्त्रीय विषय सप्रयोग शिकवले पाहिजेत. परिभाषेसंबंधी असे म्हणता येईल की शास्त्र निर्माण झाल्यानंतर शब्दही निर्माण होतील. पटाशी, वायसर हे शब्द कोणी मुद्दाम केले नाहीत, ते आपोआप निर्माण झाले आहेत."[१]

नंतरही विगोंची अनेकदा भेट झाली. सहावे मराठी विज्ञान संमेलन मुंबईत २५ व २६ डिसेंबर १९७१ रोजी भरले. तत्पूर्वी भारत-पाकिस्तान युद्ध पेटले होते. प्रकाशबंदीची नियंत्रणे आली होती. संमेलन पुढे ढकलावे काय अशी चर्चा चालली असताना विगो ठामपणे म्हणाले की "मराठी विज्ञान परिषद व तिची संमेलने राष्ट्राला बलिष्ठ करणारे व आवश्यक उपक्रम आहेत. प्रकाशबंदीमुळे वेळा बदलाव्यात, पण संमेलन व्हायलाच हवे." सुदैवाने काही दिवस अगोदर युद्ध संपले व संमेलन मूळ ठरल्यानुसारच साजरे झाले. एका परिसंवादात विगो म्हणाले -

"आपला समाज विज्ञानाभिमुख नाही याची मुख्य कारणे दोन. पाश्चात्यांचा विज्ञानाशी संबंध आला, तो एक प्रगतीचे, उत्कर्षाचे साधन म्हणून. याउलट भारतीयांचा विज्ञानाशी मित्रत्वाच्या पातळीवर संबंध आला नाही. एक जित राष्ट्र म्हणून आपण जेत्यांच्या विज्ञानाबद्दल साशंकतेने बघू लागलो. हा दुराग्रह हळूहळू गेला, पण दरम्यान विज्ञानाने इतकी भरारी मारली की विज्ञान आत्मसात करणे आपणास जड झाले. प्रयत्न, श्रम यांना आपण योग्य महत्त्व देत नाही. लघुउद्योगाचा आपण उदोउदो करतो, पण लग्नाच्या बाजारात एखाद्या सायकल रिपेअररपेक्षा कमी उत्पन्न असले तरी पांढऱ्या कॉलरचा माणूस पसंत केला जातो. समाजात विज्ञानाबद्दल आस्था वाढवण्यासाठी वृत्तपत्रांनी वैज्ञानिक सदरे चालवावीत. आकाशवाणीने देखील असा उपक्रम चालू करावा. व्यक्तिगत पातळीवर आपण काय केले पाहिजे? प्रत्येक नवनवीन गोष्टीवर तर्कशास्त्राने विचार करावा. आपले काम उत्कृष्ट करावे."[२]

१९७१ मध्ये मुंबईत दूरदर्शन नव्हते म्हणून भाषणात त्याचा उल्लेख झाला नव्हता. कोणतेही जुने संदर्भ वाचताना तत्कालीन परिस्थिती लक्षात घ्यावी. उदा. जुन्या काळातील पगाराचे आकडे आज नगण्य वाटतात. १९७१ मध्ये वृत्तपत्रे तुरळकपणे विज्ञानावर लिखाण प्रसिद्ध करीत होती. नंतरच्या काळात विज्ञान-

सदरे, विज्ञान-पुरवण्या यांचे आगमन काही वृत्तपत्रांत झाले. विशेष म्हणजे वैज्ञानिक सदरे असावीत ही त्यांची सूचना त्यांनी उत्तर आयुष्यात कृतीने अंमलात आणली.

विगोंना विज्ञानसंशोधनात पूर्ण आस्था होती. पण विज्ञानशिक्षणाकडे वळण्यास एक निमित्त झाले. मुंबई महानगरपालिकेने एका विज्ञानप्रदर्शनाबाबत टाटारिसर्चकडे सल्ला मागितला. तेव्हा शाळांतील विज्ञानशिक्षण निकृष्ट आहे असे विगो व अन्य सहकाऱ्यांना दिसले. याबाबत चर्चा झाल्या. शिक्षकांना प्रशिक्षण दिले पाहिजे हे स्पष्ट झाले. भाषा कठीण असली तर भाषेचा अर्थ लावण्यातच विद्यार्थ्यांची ताकद जाते, विज्ञान बाजूला रहाते व शिक्षण म्हणजे पोपटपंची ठरते. उदा. मिठाच्या अभावी आरोग्य बिघडते या वाक्यातील - अभावी - हा शब्द काहीजणांना आकलन होत नाही. पुरेसे मीठ खाल्ले नाही तर आजार येतात, हे वाक्य सोपे आहे. इयत्ता पाचवी ते सातवी बाबतीत विचार झाला. शासनप्रणीत पुस्तके बदलण्यास वेळ लागतो. पूरक पुस्तके करावीत असे ठरले. यातून खूप अनुभव आले. मग एक कायम केंद्र करण्याचा विचार उदयास आला. त्यासाठी द्रव्यसाहाय्य हवे होते. टाटारिसर्चमधील विगो यांचे गुरु प्रा. भा. मा. उदगावकर यांनी नोंद केली आहे -

"विगो माझ्याशी वारंवार चर्चा करीत असत. शिक्षक उत्साही असतात, गुणवत्तेतही कमी नसतात, त्यांना योग्य तज्ज्ञेचे मार्गदर्शन देण्याची मात्र आवश्यकता आहे. आपल्या सामाजिक परिस्थितीस अनुरूप अशा संशोधनाची जरूर आहे. आपण परदेशी साहाय्यावर अवलंबून असता कामा नये, असे आमच्या चर्चेत वारंवार येई. २२ फेब्रुवारी १९७४ रोजी विगो, मी आणखी दोन सहकारी दोराबजी टाटा ट्रस्टचे प्रा. रूस्तम चोकसी यांना भेटलो. चर्चेनंतर दोराबजी ट्रस्टने पाच वर्षांसाठी आर्थिक सहाय्य देऊ केले, व प्रकल्पाला होमी भाभा विज्ञान शिक्षण केंद्र हे नाव द्यावे असेही सुचवले. जुलै १९७४ मध्ये जेआरडी टाटा यांनी शिक्षणकेंद्राची प्रतिष्ठापना केली."[३]

विगो हे होमी भाभा विज्ञान शिक्षण केंद्राचे (= होमीकेंद्र) पहिले संचालक झाले. ते विज्ञानसंशोधनाकडून विज्ञानशिक्षणाकडे कायमचे वळले. मुंबई महानगरपालिकेच्या नाना चौक येथील शाळेच्या इमारतीतील काही भागात होमीकेंद्र चालू झाले. म्युनिसिपल शाळांमध्ये तळागाळातील मुले येतात. तेथील मुले हुशार







नसतात असा एक समज आढळतो. पुढील काही वर्षे होमीकेंद्राने म्युनिसिपल शाळांमधील कित्येक शिक्षक व मुले यांना मार्गदर्शन करून, विज्ञानशिक्षणाची पद्धत सुधारल्यावर, ही मुले परीक्षेत उत्तम गुण मिळवतात असे सिद्ध केले.

पाच वर्षे दोराबजी ट्रस्टने होमीकेंद्राला चांगली मदत केली. १९८० मध्ये टाटारिसर्चने होमीकेंद्राची पूर्ण आर्थिक जबाबदारी घेतली. १९९२ मध्ये देवनार, मुंबई येथे होमीकेंद्राची इमारत निर्माण झाली. या इमारतीचे आराखडे करताना आर्किटेक्टबरोबर विगोंनी बारकाईने चर्चा केली. ही चर्चा व प्रत्यक्ष बांधणीचे काम पाहणे हे आनंददायक व उद्‌बोधक अनुभव होते, असे विगो म्हणायचे. होमीकेंद्र त्या इमारतीत गेल्यानंतर दोन वर्षांनी सप्टेंबर १९९४ मध्ये विगो तेथून निवृत्त झाले.

होमीकेंद्राने मुंबई महानगरपालिकेच्या विद्यार्थ्यांपुरते कार्य मर्यादित ठेवले नाही. ग्रामीण भागात देखील विज्ञानशिक्षणाच्या खूप समस्या आहेत. माजी शिक्षणमंत्री श्री. मधुकरराव चौधरी यांनी जळगाव जिल्ह्यातील काही शाळांमध्ये विज्ञानशिक्षण सुधारण्याबाबत होमीकेंद्रास काम दिले. त्याची सुरुवात खिरोदा येथे झाली. होमीकेंद्राची मेटॅडॉर गाडी, विगो व त्यांचे सहकारी यांना खिरोदा येथे घेऊन जात असे. त्यांच्याबरोबर १९७७ मध्ये मी एकदा निरीक्षक म्हणून गेलो होतो. त्याच वर्षी विगो यांच्या पुढाकाराने परिषदेचे बारावे मराठी विज्ञान संमेलन खिरोदा येथे भरवण्यात आले.

महाराष्ट्रात होमीकेंद्राला पुढे ठिकठिकाणी कामे मिळू लागली. प्रत्येक समस्या ही वेगवेगळी व आव्हानात्मक होती. काही ग्रामीण भागात शिक्षकांना विज्ञानाबद्दल आस्थाच नसते, ती निर्माण करणे हेही काम उद्‌भवले. मराठीप्रमाणे अन्य भाषांमधून पुस्तकलेखनाचे कार्य चालू झाले. इयत्ता ८ ते १० विद्यार्थ्यांचेही प्रश्न हाताळले गेले. सुटसुटीत प्रयोगसाधने सुचवली गेली. उदा. झाडाच्या पानांमधून पाणी बाहेर येते हा प्रयोग करण्यासाठी मोठी काचेची बरणी घ्या, त्यात कुंडीतील रोपटे ठेवा, पुठ्ठे लावा वगैरे पाठ्यपुस्तकातील सूचना न वापरता झाडावरील पानांभोवती प्लास्टिकची पारदर्शक पिशवी बांधा. दुसऱ्या दिवशी त्यात काय दिसले? पाण्याचे बारीक थेंब दिसले. हे कोठून आले. असे सुलभ प्रयोग व प्रश्न विद्यार्थ्यास चौकस बनवतात, त्याला विज्ञानात रस निर्माण होतो. होमीकेंद्राचे अनुभव व निष्कर्ष बघून पुढे काही प्रमाणात शासकीय पाठ्यपुस्तकांत बदल झाले.



अनुक्रमणिका

देशात व विदेशात विगोंना चर्चेसाठी, निबंध सादर करण्यासाठी निमंत्रणे आली. अमेरिका, युरोप हे तर झालेच. त्याशिवाय चीन, थायलंड, ऑस्ट्रेलिया, इस्राएल अशा ठिकठिकाणी विगो गेले. विज्ञानशिक्षणात डॉक्टरेटच्या विद्यार्थ्यांसाठी मार्गदर्शक म्हणून काही विद्यापीठात त्यांची नेमणूक झाली. १९८५ मध्ये त्यांना गोवर्धन पारीख पुरस्कार मिळाला. राष्ट्रीय शिक्षण संशोधन संस्था, इंडियन इन्स्टिटयूट ऑफ एज्युकेशन, काही विद्यापीठे यांच्याशी त्यांचा निकटचा संबंध आला.

मराठी विज्ञान परिषदेने त्यांना डिसेंबर १९८८ मध्ये चाळीसगाव येथील तेविसाव्या मराठी विज्ञान संमेलनाचे अध्यक्षपद दिले. अध्यक्षीय भाषणात विगोंनी आपले चिंतन व अनुभव सांगितले आहेत. सोयीसाठी काही शीर्षके टाकून, किरकोळ शब्दबदल करून, एक परामर्श घेतला आहे.[४]

**ज्ञानाची प्राप्ती व संक्रमण** - भाषेच्या द्वारे विचारांची देवाणघेवाण, मूर्त तसेच अमूर्त संकल्पना, हत्यारे, अवजारे, कला, कौशल्य इत्यादी वैशिष्ट्यांच्या जोरावर मानवाने पृथ्वीचा नूरच बदलून टाकला आहे. ही सारी प्रगती एका पिढीची नाही. अनेक पिढ्यांच्या कर्तृत्वाचा तो संकलित परिपाक आहे. ज्ञानार्जन हे वैशिष्ट्य खरेच, परंतु ज्ञानसंक्रमण हे अभूतपूर्व वैशिष्ट्य मानावे लागेल. संक्रमण होते ते ज्ञानाचे. माहितीच्या ढिगाऱ्याचे नव्हे. दैनंदिन अनुभव हा ज्ञानप्राप्तीच्या प्रक्रियेतील कच्चा माल आहे. नैसर्गिक अनुभवांचे सार काढणे, ते सार सूत्रमय, शक्यतो गणिती भाषेत व्यक्त करणे, या सूत्रावर संस्कार करून नवीन ज्ञान संपादन करणे इत्यादी कौशल्ये विकसित व्हायला हजारो वर्षे लागली. या कौशल्याच्या जोरावर माहितीच्या ढिगाऱ्याचे ज्ञानात रूपांतर करण्यात यश आल्यावरच मानवी प्रगतीला घोडदौडीचे स्वरूप आले. काही हजार वर्षे मानव शेती करीत आहे, आकाश पाहत आहे, विविध वस्तू हाताळत आहे. परंतु गुंतागुंतीचे कार्यकारणभाव व्यक्त करू शकणारी भाषा, गणिती सूत्रांचा वापर करण्याचे कौशल्य इत्यादी ज्ञानार्जनाची साधने सिद्ध झाल्यावरच घटत्या उत्पादनफलाचा सिद्धांत, न्यूटनचे विज्ञाननियम वगैरे दुर्लभ फळे प्राप्त झाली. म्हणून ज्ञानप्राप्तीची आणि ज्ञानसंक्रमणाची साधने देणे हे शिक्षणाचे मूलभूत उद्दिष्ट मानायला हवे.

**निकृष्ट शिक्षणपद्धती** - राष्ट्रीय पातळीवर शिक्षणाची पुनर्रचना करताना एक निर्णय पक्का करावा लागेल. पाश्चात्यांनी विज्ञान मिळवावे, आपण वाढप








करावे, असाच आपला बेत असेल तर सध्याची शिक्षणपद्धती चालू शकेल. परंतु नवीन ज्ञान या भूमीत पैदा व्हावे अशी जिद्द असेल तर मात्र काही मूलभूत बदल करावे लागतील. आमच्या विज्ञानशिक्षणात अनुभवाचे सार काढण्याचे शिक्षण दिले जात नाही. शास्त्रीय सिद्धांत सांगायचा आणि तो पटावा म्हणून एकदोन दाखले द्यायचे अशा पद्धतीने आपले शिक्षण चालते. वर्गातील सर्व अनुभव गोळा करावेत, मुलांनी आपल्या कुवतीनुसार त्यांचा अर्थ सांगावा, नंतर शिक्षकांनी त्या अर्थातील त्रुटींवर उजेड पाडण्यासाठी आणखी काही अनुभव सांगावेत किंवा प्रयोगशाळेत नेऊन नवीन अनुभव द्यावेत आणि हळूहळू विद्यार्थ्यांना प्रस्थापित सिद्धांताकडे न्यावे हीच खरी शिक्षणपद्धती. या पद्धतीत सिद्धांताबरोबर ज्ञानार्जनाच्या मार्गाची, त्यातील खाचखळग्यांची स्पष्ट कल्पना येते आणि ज्ञानसंपादनाचा आनंद मिळतो. आजच्या शिक्षणानुसार उष्णतेने घनाचे द्रवात रूपांतर होते हे वाक्य पाठ करायचे. त्यावेळी उष्णतेने लाकूड का वितळत नाही? हे विचारायचे नाही. विचारशक्तीची किंवा सर्जनशीलतेची परीक्षा केली जात नाही. होल्डॉल किती गच्च भरला आहे आणि त्यातून हवी ती वस्तू चटकन काढून देता येते काय, अशी परीक्षा होते. या निकृष्ट शिक्षणपद्धतीने विद्यार्थ्यांचे व समाजाचे खूप नुकसान होते.

**भाषेचे महत्त्व** - मानवी विकासामध्ये भाषेचा वाटा फार मोठा आहे. सामाजिक विषमतेमुळे दुर्बल घटकांची व्यवहाराची भाषासुद्धा समृद्ध नसल्याने या वर्गातील विद्यार्थी मागासच रहातात. भाषेच्या अध्ययनाचे महत्त्व लक्षात न आल्यामुळे अभ्यासक्रमांतून संस्कृत काढून टाकणे, इंजिनिअरिंग व मेडिकल अशा प्रतिष्ठित शाखांत प्रवेश देताना भाषाविषयात मिळालेले गुण लक्षात न घेणे यासारखे घातक निर्णय घेण्यात आले आहेत. ज्ञानार्जनाचे आणि ज्ञानसंक्रमणाचे भाषा हे प्रमुख शस्त्र बोथट झाल्यावर वाचलेल्या मजकुराचे सार काढणे आणि माहितीचे ज्ञानात रूपांतर करणे ही कौशल्ये लुप्त होत चालली आहेत. परीक्षेत उथळ प्रश्नोत्तरे होतात. जनसामान्यांची भाषा त्यांच्या व्यवहारापुरती मर्यादित आणि कथेकरी असते. या भाषेचे वर्णन 'स्थिर भाषा' असे करू. तिच्यात दैनंदिन व्यवहार करता येतात. परंतु संपूर्ण नवीन विचार, नवीन तत्त्वे सांगण्याचे सामर्थ्य तीत नसते. स्पष्ट संकल्पना, अचूक शब्दप्रयोग, विधानाच्या व्याप्तीचे यथार्थ वर्णन यासाठी लागणाऱ्या भाषेस 'चर भाषा' म्हणू. "स्प्रिंगला वजन लटकावल्यास तिची लांबी वाढते आणि वजन काढून घेतल्यास ती पूर्ववत

होते" हे विधान बिनशर्त खरे नाही. काही मर्यादा सांभाळल्या तरच या अनुभवाचा प्रत्यय येतो. 'चर' भाषेची गरज विज्ञानाप्रमाणे सर्वच क्षेत्रात भासते. मराठी कवितेला चाकोरीतून बाहेर खेचणाऱ्या मर्ढेकरांना चरभाषेचा आश्रय घ्यावा लागला. त्यांची चर भाषा पचनी पडेपर्यंत दुर्बोध वाटली. विज्ञानतंत्रज्ञान यांसह ज्ञानाच्या सर्व क्षेत्रांत या भरतखंडात नवनिर्मिती व्हावी अशी आपली ईर्ष्या असेल, तर स्थिर भाषेकडून चर भाषेकडे प्रवास करण्याचा नियोजनपूर्वक प्रयत्न केला पाहिजे. आपण उलटया दिशेने प्रवास करीत आहोत. भावी इंजिनिअरला उच्च शिक्षण देणाऱ्या संस्थेत प्रवेश देताना - तुझे भाषेचे गुण विचारात घेतले जाणार नाहीत - असे आश्वासन देण्याचा अर्थ हा की पूल बांधण्याची नवी युक्ती तुला सुचली नाही तरी चालेल. कंत्राटदाराकडून स्वतःचा लाभ कसा करावा हे तुला कळले म्हणजे पुरे! हे सारे विवेचन केवळ सैद्धांतिक नाही. त्याला अनुभवाचा आधार आहे. गेली काही वर्षे होमी भाभा विज्ञान शिक्षण केंद्राने पुस्तकातील काही उतारे वाचून त्याचे सार काढण्याचे कौशल्य महानगरपालिकेच्या मागासवर्गीय विद्यार्थ्यांत विकसित करण्याचे प्रयत्न केले. हळूहळू विद्यार्थ्यांची आकलनशक्ती वाढली, वाचनाची गोडी लागली. त्यांनी शालान्त परीक्षेत घवघवीत यश मिळवले. १९७५ ते १९७८ या कालात खिरोदा येथे म्हणजे ग्रामीण भागात एक कृतिसंशोधन प्रकल्प राबविला होता. विद्यार्थ्यांचे बोलण्याचे कौशल्य, त्यांनी व्यक्त केलेल्या मतातील त्रुटी नेमक्या हेरून, विद्यार्थ्यांना पुन्हा विचार करायला लावेल असे प्रत्युत्तर देण्याचे शिक्षकाचे कौशल्य - ही कौशल्ये विकसित झाल्यावर शिक्षक आणि विद्यार्थी यांचा सुसंवाद वाढतो, अर्थपूर्ण होतो.

**संकीर्ण** - चित्रांची भाषा सर्वांना आपोआप येते ही समजूत चुकीची आहे. वाहात्या नळाच्या चित्रासोबत फुली असेल तर चित्र चुकीचे आहे असा अर्थ काही मुले काढतात, नळ वहाता ठेवू नये असा बोध त्यांना होत नाही. पुस्तकांतील चित्रांचा उपयोग कसा करावा याचे प्रशिक्षण शिक्षकांना आवर्जून द्यायला हवे. आपल्या डोळ्यांतून प्रकाशकिरण बाहेर पडतात, लोहचुंबक लोखंडाला खेचतो, लोखंड लोहचुंबकाला खेचत नाही अशी बहुसंख्य मुलांची धारणा असते. मानवी मन स्वतःहून काढलेले निष्कर्ष, चुकीचे असले तरीही, टाकून द्यायला सहसा तयार होत नाही. म्हणूनच अंधश्रद्धा निर्मूलन करणे कठीण असते. चुकीचे समज








जाण्यासाठी विद्यार्थ्यांनी प्रयोग केले पाहिजेत, व्यक्तिगत करणे शक्य नसल्यास समान प्रयोग करावेत. तोफा, बंदुका वापरणाऱ्या मूठभर टोपीकरांनी आम्हांस पाणी पाजले, तरीही ही अस्त्रे इतिहासकालात घडवण्याचा ध्यास आम्ही घेतला नाही. आजही अर्ध्या प्रजेला पिण्याचे पाणी स्वच्छ मिळत नाही याची आपणास खंत वाटत नाही. अनुभवाचे ज्ञानात रूपांतर करण्याचे कौशल्य नसले, जाणिवा बोथट झाल्या की कशाचेच काही वाटत नाही. "यावरून दृष्टोत्पत्तीस येते" अशी दुर्बोध भाषा वापरल्याने विद्यार्थ्याला ज्ञानलक्ष्यी साहित्य वाचण्याची गोडी लागत नाही. मातृभाषेत विचार करणे सोपे जाते. नवीन विचार मराठीतून करता आले तर नवीन विज्ञान सिद्ध होईल आणि मराठी भाषाही समृद्ध होईल. असे हवे असेल तर अर्थवाही अचूक भाषा तयार करावी लागेल. बर्फ, पाणी, वाफ या पाण्याच्या तीन अवस्था आहेत, या वाक्यात पाणी या शब्दाचा दुहेरी उपयोग होतो. मग नेमका अर्थ कोणता? जल हा शब्द उपयुक्त ठरेल, त्याशिवाय स्फटिकजल म्हणजे स्फटिकातील जलाचे रेणू ही संकल्पना स्पष्ट होईल. अंकुरणे व रूजणे, इंद्रिय व अवयव यातील सूक्ष्म भेद स्पष्ट जाणून भाषेचा काटेकोर वापर करणे हितावह होईल. पारिभाषिक शब्द नेमका कोणता असावा हा वाद नाही, भाषा अर्थवाही व काटेकोर करण्याचा हा प्रश्न आहे.

विगोंचे पूर्ण भाषण व काही इंग्रजी-मराठी लेख होमींकेंद्राने एकत्र प्रसिद्ध केले आहेत.[५]

होमींकेंद्रातून निवृत्त झाले तरी विगो तेथे अधूनमधून अभ्यास व चर्चा यासाठी जात असत. परंतु त्यांच्या जीवनक्रमात पुन्हा एक बदल झाला. 'लोकसत्ता' दैनिकातून ते दर आठवड्यास एक सदर लिहू लागले. १९९४ मध्ये 'तिसरे पाऊल', १९९५ मध्ये 'अनोखा उंबरठा', १९९६ मध्ये 'संधिप्रकाश', १९९७ मध्ये 'संस्कार', १९९८ मध्ये 'गाथा शोधांची', २००० मध्ये 'गाथा मुहूर्तमेढींची' ही त्यांची शीर्षके होती. १९९८ मध्ये 'Quest - Milestones in Science' हे साप्ताहिक सदर इंडियन एक्सप्रेसमध्ये चालवले. यातील काही लेख विज्ञानावर होते, काहींत अन्यही माहिती होती. काहीत अन्य सहकारी होते. 'संधिप्रकाश' हे सदर श्री. बाळ फोंडके यांच्यासमवेत लिहिले होते. ती लेखमाला प्रसिद्ध होताना हेरंब साने असे लेखकाचे टोपणनाव येत असे. (विनायक = हेरंब आणि बाळ = लहानसान) 'अनोखा उंबरठा' ही लेखमाला नंतर राजहंसने

प्रकाशित केली.[६] हे लेख सर्वस्वी विगोंनी लिहिले. जग व भारत एकविसाव्या शतकाच्या उंबरठ्यावर आहे, पुढे काय होणार आहे याची चिंता आहे; हा त्यात मुख्य संदर्भ होता. मूल्ये कशी ढासळत आहेत त्याचेही संदर्भ त्या लेखांमध्ये आहेत. उदा. काही वर्षांपूर्वी दूध-ताक अशी पेये देणारे व चहाकॉफी नाकारणारे दुकान आता पार्टीशन टाकून बिअरबार थाटत आहे. भारतात टाटा यांनी पोलाद कारखाना चालू केला पण त्यांना डावलून परकीय मदत पुढील पोलाद कारखान्यांसाठी घेण्यात आली, आपल्याला स्वदेशाभिमान नाही याची खंत त्यात आहे. परदेशात विविध इतिहासतज्ज्ञ, विविध वैज्ञानिक, एकत्र येऊन चर्चा करतात, ज्ञानाचे आदानप्रदान होते, तसे भारतात होत नाही त्यामुळे आपण मागे रहातो, असे भारतीयांच्या एका कमतरतेकडे नेमके बोट ठेवले आहे. सर्व बावन्न लेख वाचनीय आहेत. विज्ञानाबरोबरच इतिहास, व्यापार, कला, साहित्य, राजकारण, तत्त्वज्ञान या सर्वांचा बराच अभ्यास विगोंनी केला होता. अतिशय मार्मिकपणे त्यांनी हे लेख लिहिले आहेत. त्यांची ही व अन्य लेखमाला लोकप्रिय झाल्या.

विगोंची व्याख्याने व गप्पा ऐकण्याचा योग मला कित्येकदा आला. त्यांचे निवेदन खुसखुशीत शैलीत असे. ते आपला विषय सोपा करून समजावून सांगत असत. १९९७ मध्ये मी मुंबई सोडून पुणे येथे स्थायिक झालो. भेटीगाठी फार कमी झाल्या. शेवटची भेट पुण्यात पाठ्यपुस्तक मंडळाच्या सभागृहात ६ जुलै २००२ रोजी झाली. पाठ्यपुस्तकांस पूरक अशी काही पुस्तके त्या दिवशी मंडळाने प्रसिद्ध केली. 'शालेय मराठी शब्दसंग्रह' हे पुस्तक त्यापैकीच. विगो हे संपादन समितीचे अध्यक्ष होते. मी मार्च ते जून परदेशी होतो त्यामुळे विगोंच्या आजाराची मला कल्पना नव्हती. समारंभानंतर विगो भेटले. हातात काठी आली होती. काही आठवड्यांपूर्वी ते मेंदूतील रक्तस्रावाने आजारी होते असे समजले. पण ते नेहमीप्रमाणे प्रसन्न होते. चेहऱ्यावर स्नेहभाव होता.

मराठी अभ्यास परिषदेचे अध्यक्ष डॉ. अशोक केळकर यांनी 'भाषा आणि जीवन' या त्रैमासिकासाठी विगोंवर लेख देण्यास मला सुचवले. आपले मेंदूचे दुखणे वाढत नाही ना, हे कुटुंबियांना विचारण्यासाठी विगो शब्दकोडी व बुद्धिबळे यात गुंतले होते. अशा प्रयोगशील, प्रयत्नवादी, बुद्धिवान तरीही सामाजिक बांधिलकी असलेल्या, आस्तिक व मनमिळाऊ मित्राला मी शब्दांमध्ये पकडू शकत नाही.

**संदर्भ टिपा -**

(१) 'मराठी विज्ञान परिषद वार्तापत्र', मार्च, १९६७
(२) 'मराठी विज्ञान परिषद पत्रिका', जांने-फेबु, १९७२
(३) 'मराठी विज्ञान परिषद पत्रिका', सप्टेंबर २००२ प्रा. भा.मा. उदगावकर यांचा लेख.
(४) तेविसावे मराठी विज्ञान संमेलन अध्यक्षीय भाषण १९८८ (मराठी विज्ञान परिषद)
(५) 'Selected papers of Prof. V.G. Kulkarni' (Homi Bhabha Centre for Science Education) October 1992
(६) 'अनोखा उंबरठा' - वि. गो. कुलकर्णी (राजहंस प्रकाशन, पुणे) १९९७ ■

४ पवन अपार्टमेंट, लक्ष्मी पार्क, नवी पेठ, पुणे ४११ ०३०.
इमेल mngogate@vsnl.com

## कानी पडलेला संवाद

हल्ली सासू-सून-नात्याबद्दल पांढरपेशा समाजात बरीच चर्चा चालू आहे. त्यातून मराठी भाषेत 'सूनवास' शब्दाची भर पडली आहे. आता हा एक दोघीत झालेला संवाद ऐका -

'सासू-सुनांचं का बिनसतं याचं एक कारण माझ्या लक्षात आलं.'
'कोणतं?'
'आता सासू शब्द कशाचा संक्षेप आहे?' "सारख्या सूचना!"
'आणि सून शब्दाचं काय?'
'तो "सूचना नको" याचा संक्षेप आहे.'
या संवादात कोणते शब्द कुणाच्या तोंडचे आहेत हे वाचकांनी ओळखावे. ■

## ज्याची त्याची प्रचीती

# माहेरची भाषा

**ग. प्र. प्रधान**

‘भाषा आणि जीवन’च्या पावसाळी अंकाच्या संपादकीयामध्ये ‘भाषेला मुख्य अधिष्ठान असतं मौखिकतेचं’ असे लिहिले असून हा मुद्दा विस्ताराने, मार्मिकपणे मांडला आहे. प्रा. शंकर वैद्य यांच्या लेखांमध्येही लहानपणापासून आपला संबंध कसा येतो हे सांगतांना बोली भाषेतील ‘चिऊ-काऊ’ आदी शब्दांचा अन्वर्थक उल्लेख त्यांनी केला आहे. माझ्या पिढीत ९० टक्क्यांहून अधिक लोक निरक्षर असत. म्हणजे त्यांच्या दृष्टीने बोलीभाषा हीच मातृभाषा होती. या संदर्भात पस्तीस एक वर्षांपूर्वी मला आलेला एक अनुभव मी सांगू इच्छितो. मी मालवणला राजकीय कामासाठी गेलो असताना एका डॉक्टरांच्या घरी उतरलो होतो. त्यांच्या घरीच त्या दिवशी रात्री मी पंधरा-वीस निवडक कार्यकर्त्यांशी बोलून चर्चा करणार होतो. त्या घरात स्वयंपाकाचे काम करणाऱ्या साठीतील बाई डॉक्टरांच्या पत्नीला म्हणाल्या की त्यांची रात्री माझ्या भाषणाला बसण्याची इच्छा असून त्या दिवाणखान्याच्या मागच्या खोलीत बसून हे ऐकतील. मालकीणबाई म्हणाल्या की त्यांना माझ्या भाषणातलं काही कळणार नाही. बाई म्हणाल्या की ते त्यांना ठाऊक असलं तरी त्यांना माझं बोलणं ऐकायचं आहे. मालकीणबाईंनी त्यांना माजघरात बसून ऐकायची परवानगी दिली. आमची बैठक संपल्यावर बाई मालकीणबाईंना म्हणाल्या, “मला त्यांना नमस्कार करायचाय” आणि त्या आम्ही बैठकीनंतर चहा पीत होतो तेथे येऊन माझ्या पाया पडू लागल्या. एका वृद्ध बाईने आपल्याला नमस्कार करणे योग्य नाही असे वाटून मी म्हणालो, “आजी, तुम्ही कसला मला नमस्कार करता?” बाई म्हणाल्या, “आपलं भाषण ऐकून माझे कान तृप्त झाले” आम्हां सर्वांनाच या त्यांच्या उद्‌गाराचं आश्चर्य वाटलं. मी त्यांना विचारलं, “बाई तुम्हाला भाषणातलं काय समजलं?” बाई म्हणाल्या “साहेब, मला भाषणातलं काय कळणार? मी अडाणी बाई पण ‘बोलणं’ ऐकून बरं वाटलं” आणि त्या पुढे म्हणाल्या, “माझं माहेर पुण्यातलं सदाशिव पेठतलं. पण आईवडील माझ्या लहानपणीच वारले. माझ्या चुलत्यांनी माझं लग्न करून मला मालवणात दिली. आम्ही गरीब माणसं आणि मायेचे

आईवडील गेल्यामुळं मी परत कधी पुण्याला गेलेच नाही. इथे आल्यावर इथल्या लोकांचं बोलणं मला समजेना. हळू हळू सवय झाली. आता मी तशीच बोलते. आपल्याला सकाळी जेवताना बोलताना ऐकलं आणि लहानपणची आठवण झाली. तसं बोलणं पोटभर ऐकायला मिळावं म्हणून मी आपलं भाषण ऐकत होते." त्यांच्या डोळ्याला पाणी आलं. त्या म्हणाल्या, "मला माहेरचं माणूस भेटल्यासारखं आज वाटलं." मी त्या वृद्ध बाईंचे बोलणे ऐकून चक्रावूनच गेलो. मी त्यांना म्हणालो, "बाई तुम्हांला मी चार दिवस माझ्या घरी नेतो. तुम्ही तिथं लहानपणचं काही आठवलं तर त्या घराकडं जाऊन या. कोणी भेटलं नाही तर तुळशीबागेत रामाला जाऊन या. सदाशिव पेठेतल्या खुन्या मुरलीधराच्या देवळात मी तुम्हाला नेईन." बाई म्हणाल्या, "मला इतका लांबचा प्रवास नाही व्हायचा. आता ही हाडं इथंच पडायची." आणि त्या चटकन घरात गेल्या. मी राजकारण, आमची चर्चा सारं विसरलो होतो. मला सदाशिव पेठेतील भाषा जी प्रमाण भाषा मानली जाते ती पन्नास वर्षांपूर्वी त्या मुलीची मौखिक भाषा होती. ती बिचारी शाळेतही गेली नव्हती. पण तिला माहेरची ती भाषा बोलणारा कोणीतरी आलाय. म्हणून त्याचं बोलणं पोटभर ऐकायचं होतं. आपलं संपादकीय आणि प्रा. शंकर वैद्य यांचा लेख वाचताना ही आठवण माझ्या मनात जागी झाली. प्रा. शंकर वैद्य यांच्या लेखात त्यांनी लिहिले आहे की 'मिठू मिठू पोपट' हे शब्द ऐकून एका पोपटाने आकांत करून प्राण सोडला. माहेरची भाषा कानावर पडल्यावर मालवणला त्या वृद्ध बाईंच्या डोळ्याला पाणी आलं.

■

वॅ. गाडगीळ रस्ता, सदाशिव पेट, पुणे ४११ ०३०.

## सूचना फलक

वर्ष - २०:४ दिवाळी २००२ या अंकातील मुद्रित चुकांबद्दल दिलगिरी व्यक्त करीत आहोत. तपशील पुढीलप्रमाणे -

| पृष्ठ | ओळ | शब्द असा आहे | असा वाचावा |
|---|---|---|---|
| ९ | २३ | बोली | बोलीं |
| १३ | २६ | असवय | असवय़ |
| १४ | २५ | मानव | मानीव |
| १६ | १८ | वैज्ञानिक | विज्ञानिक |
| ३९ | १६ | अपरिहाय | अपरिहार्य |
| ३९ | २२ | न्हायरी | न्याहरी |

# मराठीचे 'त्रिकालदर्शन'

हे. वि. इनामदार

'जननी जन्मभूमिश्च स्वर्गादपि गरीयसी ।' या सुभाषितांत जन्मभाषेचाही समावेश केला पाहिजे. जननी, जन्मभूमी आणि जन्मभाषा या तिघी स्वर्गापेक्षाही श्रेष्ठ आहेत. जन्मदा माता, मातृभूमी भारतमाता आणि मातृभाषा मराठी ही तिन्ही आपली देवतुल्य श्रद्धास्थाने आहेत. यापैकी माता आणि मातृभूमी यांची महती अनेकांनी गायिली आहे. राहता राहिली मातृभाषा. मराठी या आपल्या मायबोलीची स्थिती पूर्वी कशी होती, सांप्रत तिची अवस्था कशा स्वरूपाची आहे; आणि यापुढे तिचे भवितव्य कसे घडावे - घडवावे, या विषयीचा मागोवा घेणे उद्‌बोधक ठरेल.

**मराठीची पूर्वस्थिती**

बाराव्या शतकापासून अठराव्या शतकापर्यंतच्या मध्ययुगीन महाराष्ट्रात विविध धर्मसंप्रदायांनी, पंडित कवींनी आणि शाहिरांनी जाणीवपूर्वक आपापल्या रचना मराठीतून सादर केल्या. महानुभाव, नाथ, वारकरी, दत्त व समर्थ या पाच प्रमुख संप्रदायांचे प्रणेते व त्यांच्या प्रभावळीतील व्यक्ती यांचे वाङ्मय मराठीत आहे. मोरोपंत, वामन पंडित, श्रीधर, नागेश प्रभृती पंडित कवींनी संस्कृत महाकाव्यांतील आख्याने मराठीत उपलब्ध करून दिली. प्रभाकर, राम जोशी, सगनभाऊ आदि शाहिरांच्या लावण्या व पोवाडे मराठीतच आहेत. या सर्वांनी वैचारिक वाङ्मयातून प्रबोधन केले; आणि कथात्मक साहित्यातून लोकरंजन साधले.

महानुभाव महंत आणि वारकरी संत यांनी मराठीचा जो कैवार घेतला, तो सहजसाध्य नव्हता. त्या काळात संस्कृत विद्येचा वरचष्मा होता. संस्कृतमधील लेखन हे विद्वत्तेचे लक्षण होते; त्या लेखनाला प्रतिष्ठा होती. मात्र संस्कृतातील ज्ञानोपासना सामान्य जनांच्या आटोक्यातली नव्हती. ते त्या ज्ञानभांडाराला वंचित झाले होते. महानुभावांच्या 'स्मृतिस्थळ' या ग्रंथातील एक प्रसंग प्रत्ययकारी आहे. "मी संस्कृतमधून लेखन करू काय?' असे केसोबास यांनी नागदेवाचार्यांना विचारले. त्यावर आचार्य म्हणाले, "नको गा केशवदेवा. येणे स्वामीचिये सामान्य परिवारु नागवेल की : चक्रधरे निरुपिली मऱ्हाटीः तियाचि पुसाः"








भगवद्गीता हा हिंदूंचा प्रमाणभूत व प्रमुख ग्रंथ संस्कृतमध्ये आहे. (महाभारतातील भीष्मपर्वाचा एक भाग म्हणजे गीता - ग्रंथ होय.) गीतेचे सातशे श्लोक आहेत. ज्ञानदेवांनी ज्ञानेश्वरीच्या रूपाने नऊ हजार ओव्यांचे मराठी गीता-भाष्य लिहिले, ते म्हणतात,

*"माझा मराठाचि बोलु कौतुकें । परि अमृतातेंही पैजासीं जिंके ।*
*ऐसीं अक्षरें रसिकें । मेळवीन ॥"* - ज्ञानेश्वरी : अ.०६, ओ.१४)

- मराठीच्या वकिलीची ही पहिली सनद ज्ञानदेवांनी काढली!

ज्ञानेश्वरीची रचना इ.स. १२९० मध्ये झाली. त्यानंतर इ.स. १३५२ मध्ये महानुभाव कवी भास्करभट्ट बोरीकर यांचा 'शिशुपाळवध' हा रसाळ ग्रंथ सिद्ध झाला. आपल्या रस संपन्न मराठी शैलीविषयी भास्करभट्टांना आत्मविश्वास आहे ते म्हणतात,

*"पातां प्रमेयांची गोडीः अमृताची उपजे नावडीः*
*साखरेची कीजे कुरोंडीः कवितेसीः*
*साहित्याचिये सेजेः बोलाचा रंगु उपलविजेः*
*तैसे काव्य कीजेः म्हणे कवि भास्करूः*
*पुन वाचा रसाळाः गर्वु सांडवीन कोकिळाः*
*कलहंसा अवकळाः करीन मीः"*

संत एकनाथ (इ.स. १५३३ ते १५९९) हे खरेखुरे लोकनाथ होते. जाणते व नेणते यांच्यामध्ये उभी असलेली संस्कृत भाषेची तटबंदी त्यांना दिसत होती. म्हणूनच ते म्हणाले,

*"संस्कृत ग्रंथकर्ते ते महाकवि । मा प्राकृतीं काय उणीवी ॥*
*नवीं जुनीं म्हणावी । कैसेनि केवी सुवर्ण-सुमने?"*
*कपिलेचे म्हणावे क्षीर । मा इतरांचे ते काय नीर?"*
*वर्णस्वादे एकचि मधुर । दिसे साचार सारिखे ॥*
*संस्कृत वाणी देवें केली । प्राकृत काय चोरापासोनि झाली?"*
*असोतु या अभिमान-भुली । वृथा बोली काय काज? ॥"*

- एकनाथी भागवतः ०१/१२३, १२८ व १२९

आद्य कवी मुकुंदराज यांनी 'विवेकसिंधु' हा आपला ग्रंथ सर्वसामान्य माणसांना शास्त्रज्ञान व्हावे म्हणून मराठीतच आवर्जून लिहिला. मुकुंदराज

म्हणतात,

*"जया नाही शास्त्र-प्रतीती । नेणती तर्क-मुद्रेची स्थिती ।*
*तयालागी मराठीया उक्ती । केली ग्रंथ - रचना ॥"*

मराठीचा हा पूर्वरंग उज्ज्वल आहे. त्याला साडेसातशे वर्षांची वैभवशाली परंपरा आहे. विवेकसिंधु, लीळाचरित्र, ज्ञानेश्वरी, नाथभागवत, दासबोध असे अनेक श्रेष्ठ ग्रंथ दीपस्तंभाप्रमाणे मार्गदर्शक आहेत; मराठीला ललामभूत आहेत. 'ग्यानबा-तुकाराम' प्रभृती संतकवींची अभंगवाणी ही पारमार्थिक भावकविता आहे. या अभंग कवितेने मराठी मनांचे पोषण केले आहे. पंडित कवींच्या आख्यानांनी लोकशिक्षणाबरोबर लोकजागृती साधली. शाहिरांच्या पोवाड्यांनी वीररसाचा प्रेरणादायी आविष्कार केला; आणि त्यांच्या लावण्यवती लावणी-वाङ्मयाने शृंगार रसाचे सुरेख सिंचन केले.

एकोणिसाव्या - विसाव्या शतकांतील मराठी भाषेने वाङ्मयीन समृद्धीचा उत्कर्ष अनुभवला. इ.स. १८१८ ते १८८५ या अव्वल इंग्रजीतील मराठी वाङ्मयाने समाज प्रबोधनाचे पर्व संपन्न केले. विष्णुबावा ब्रह्मचारी, महात्मा जोतिबा फुले, लोकहितवादी अशा खंद्या लेखकांनी, तसेच प्रभाकर-दर्पण-ज्ञानप्रसारक वगैरे वृत्तपत्रांनी राजकीय स्वातंत्र्य आणि सामाजिक सुधारणा यांना प्राधान्य देऊन, सकस साहित्यनिर्मिती केली.

१८८५ ते १९२० या कालखंडात, कथा, कादंबरी, नाटक व निबंध या वाङ्मयप्रकारांतील साहित्याने माय-मराठीला सामर्थ्य आणि सौंदर्य मिळवून दिले. चिपळूणकर, हरिभाऊ आपटे, लो. टिळक, गोपाळराव आगरकर, शि.म. परांजपे, किर्लोस्कर, देवल, खाडिलकर, गडकरी असे खंदे साहित्यिक या योगदानात अग्रणी होते. संस्कृतातील आणि इंग्रजीतील उत्कृष्ट ग्रंथांचे मराठी अनुवाद करण्यात आल्यामुळे लोकशिक्षणाला एक उन्नत दिशा लाभली.

१९२० ते १९५० ही तीन दशके मुख्यतः फडके - खांडेकर - माडखोलकरांच्या वाङ्मयीन कर्तृत्वाच्या बहराने गंधित झाली आहेत. त्यानंतर विसाव्या शतकाचा उत्तरार्ध मराठी भाषेला विशेष गौरव व प्रतिष्ठा प्राप्त करून देणारा ठरला आहे. केशवसुत, सावरकर, श्री. म. माटे, वि. भि. कोलते, पु. ग. सहस्रबुद्धे, माधव ज्युलियन, न. र . फाटक, गं. बा. सरदार, आचार्य अत्रे, कृ.पां. कुलकर्णी, श्री. रं. कुलकर्णी, चित्रावशास्त्री, तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री



अनुक्रमणिका

जोशी, द.वा. पोतदार, बा.सी. मर्ढेकर, कुसुमाग्रज, वसंत कानेटकर, जयवंत दळवी, ग.दि. माडगूळकर, शंकरराव खरात .... अशा श्रेष्ठ मराठी साहित्यिकांची श्रेय - नामावली किती म्हणून सांगावी? "दिलाचे मराठे मराठीस ध्याती, तिची जाणुनी योग्यता थोरवी!", असेच या सर्वांच्या बाबतीत म्हणता येईल.

मराठीच्या पूर्वरंगातील या कालखंडात, कवींच्या अंतःकरणातील भाषाभिमान व्यक्त करणारे हे उल्लेख पाहा.

ख्रिस्ती कवी, फादर स्टीफन्स इ.स. १६१४ मध्ये रचलेल्या 'ख्रिस्तपुराण' या काव्यात म्हणतो,

*"जैसी पुष्पामाजी पुष्प मोगरी ।*
*परिमळामाजी कस्तुरी ॥*
*तैसी भाषांमाजी साजरी ॥ मराठीया ॥"*

कुसुमाग्रज लिहितात,

*"माझ्या मराठी मातीचा, लावा ललाटास टिळा ।*
*हिच्यासंगे जागतील माय देशातील शिळा ॥"*

*मराठवाड्यातील साहित्य संमेलनात कवी सोपानदेव चौधरी उद्‌गारले,*

*"माझी मायबोली आली, आज माहेराला ।"*

**मराठीची सद्यःस्थिती**

*"पूर्व दिव्य ज्यांचे, त्यांना रम्य भावि काळ ।*
*बोध हाच इतिहासाचा, सदा सर्वकाळ ॥'*

या काव्यचरणांच्या प्रकाशात मराठीची सद्यःस्थिती तपासून पाहिली, तर काही बलस्थानांबरोबर काही शबल स्थानेही आढळून येतात. या स्थानांचा वेध घेणे मार्गदर्शक ठरेल.

प्रगतीचे पैलू लक्षणीय आहेत. ते असे :-

* महाराष्ट्र राज्य निर्मिती होऊन चार दशके झाली. मराठीला राज्य शासनाने राज्यभाषेचा दर्जा दिला, त्या घटनेलाही तीन दशके होऊन गेली.

* महाराष्ट्रात मराठी भाषा, मराठी वाङ्मय आणि मराठी संस्कृती यांच्या विकासाकरिता विविध संस्था कार्यमग्न आहेत. भाषा संचालनालय, साहित्य संस्कृती मंडळ, मराठी राज्यभाषा विकास परिषद. मराठी संशोधन मंडळ, राज्य

मराठी विकास संस्था, मराठी साहित्य महामंडळ, (पुणे, मुंबई, नागपूर, औरंगाबाद, गुलबर्गा, हैदराबाद येथील) महामंडळाच्या शाखा, भाषा सल्लागार मंडळ, दाते सूची मंडळ, अशा अनेक संस्था काम करीत आहेत.

* अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलन प्रतिवर्षी विविध ठिकाणी भरत असते. त्याशिवाय आदिवासी, दलित, ग्रामीण, जैन, ख्रिस्ती, मुस्लिम, कामगार, कवी अशा समूहांची मराठी साहित्य संमेलने, तसेच प्रादेशिक साहित्य संमेलने उदंड उत्साहात पार पडतात.

* मराठी विश्वकोश, मराठी तत्त्वज्ञान कोश, मराठी पारिभाषिक संज्ञा कोश असे उत्कृष्ट कोश निघाले आहेत.

* प्रमुख दैनिकांच्या रविवार आवृत्तींतून वाङ्मयीन पुरवण्या चांगल्या स्वरूपात निघत आहेत.

* आकाशवाणी आणि दूरदर्शनच्या अनेक वाहिन्या यावर मराठीतून उपयुक्त मुलाखती, भजने, भक्तिगीते, भावगीते, भागशः नाट्यदर्शन असे कार्यक्रम दाखविले जातात.

* विविध नियतकालिकांचे सुमारे साडेतीनशे दिवाळी विशेषांक प्रतिवर्षी प्रसिद्ध होतात. त्यांतील दीडशेहून अधिक अंकांचा वाङ्मयीन दर्जा प्रशंसनीय असतो. मराठीच्या अभिवृद्धीसाठी या अंकांचे योगदान लक्षणीय आहे.

* इंग्रजी माध्यमातील शाळांतून शिकणाऱ्या विद्यार्थ्यांना मराठी (निम्नस्तर) अभ्यासावे लागते. ही प्रगतीची पार्श्वभूमी प्रेरणादायी व प्रोत्साहक आहे. पण त्याबरोबरच मराठीच्या दुर्दैवाचे दशावतार आज जे पाहावे लागतात, ते असे आहेत :-

१. इंग्रज गेले; पण इंग्रजीचे स्तोम वाढत आहे. मराठीच्या नशिबी वनवास आहे. इंग्रजी सम्राज्ञी झाली आहे.

२. पदवी मिळविलेल्या अनेक तरूणांनाही चार ओळींचा मराठी मजकूर शुद्ध लिहिता येत नाही. उदाहरणार्थ :- आर्शिवाद (आशीर्वाद), कांदबरी (कादंबरी), शिला (शीला), सूमन (सुमन), गिरीष (गिरीश), गिता (गीता) इत्यादी. अशा ढोबळ लेखनदोषाची त्यांना खंत वाटत नाही, याचीच खंत वाटते. 'शुद्ध नेटकें ल्याहावें । शुद्ध शोधावें', हा समर्थांचा संदेश युवा पिढी विसरली आहे.








३. साहित्य संमेलने, विद्यापीठीय कृतिसत्रे व अध्यापक संघाची अधिवेशने यांच्या व्यासपीठांवरून मराठीच्या उन्नतीचे ठराव केले जातात. पुढे ते ठराव बासनात गुंडाळले जातात. त्यांचे उपयोजन होत नाही.

४. शासनाने मराठीला राज्यभाषेचा दर्जा दिला आहे. पण तो कागदोपत्री राहिला आहे. शासनाकडील बहुसंख्य परिपत्रके इंग्रजीत काढलेली असतात. विद्यापीठांचा पत्रव्यवहार बऱ्याच वेळा इंग्रजी भाषेत असतो. मराठीत या गोष्टी व्हायला हव्यात. पण त्याबाबतीत हेळसांड होते.

५. कारखाने, बँका व मोठे उद्योगव्यवसाय अशा ठिकाणी इंग्रजीला सन्मानाचे स्थान आहे. दुकानांच्या पाट्या शुद्ध इंग्रजीत असतात. तिथेही इंग्रजीला अग्रस्थान असते. पाट्यांवरील मजकूर मराठीत असलाच, तर तो अनेकदा अशुद्ध असतो. जसे - उपहार (उपाहार), वीविध वस्तू भंडार (विविध वस्तु-भांडार), भाजिपाला (भाजीपाला), हनूमान फुटवेयर हौस (हनुमान फूटवेअर हाऊस) इत्यादी.

६. वृत्तपत्रे व दूरदर्शन या प्रसारमाध्यमांतून मराठीचे 'दुर्दर्शन' घडते. न निवडलेल्या तांदळाचा भात खाताना घासाघासाला खडे लागावेत, तसा हा प्रकार आहे.

७. काही शिक्षकांच्याही लेखनात भाषाशुद्धतेचा अभाव जाणवतो. काना-मात्रा-वेलांटी-शिरोरेषा-विराम-चिन्हे यांचा नेमकेपणा व अचूकपणा त्यांना माहित नसतो. सामाजिक शास्त्रे व भौतिक शास्त्रे शिकवताना विषयज्ञान महत्त्वाचे व भाषाशुद्धी गौण होय, असेही समर्थन केले जाते.

८. महाराष्ट्रात मराठी ही राजभाषा म्हणून प्रथम क्रमांकाची असली, तरी व्यवहारात तिला राजवैभव लाभलेले नाही. ते वैभव इंग्रजी व हिंदी या भाषांच्या वाट्याला गेले आहे.

९. विद्यापीठीय स्तरावर विज्ञान, तंत्रज्ञान, गणित, संख्याशास्त्र व संगणकशास्त्र मराठीतून शिकण्यासाठी ग्रंथ व अन्य सुविधा उपलब्ध नाहीत. तिथेही इंग्रजीचीच मिरासदारी आहे.

१०. जागतिक मराठी परिषदेत मराठीचा डिंडिम पिटला जातो; पण गाव-पातळीवरही मराठीची उपेक्षा केली जाते. "मराठीच्या मस्तकावर सोन्याचा मुगुट असला, तरी तिच्या अंगावर फाटकी वस्त्रे आहेत," हे कुसुमाग्रजांचे म्हणणे सार्थ आहे. "हिच्या लक्तरांची नसे लाज आम्हा!" हे सत्य विदारक आहे.

सांप्रत काळी मराठीची जी अवस्था झाली आहे, तिच्याविषयी ग्वाल्हेरच्या साहित्य संमेलनात, १९६१ साली, कुसुमावती देशपांडे यांनी काढलेले उद्‌गार आजही तितकेच यथार्थ आहेत. त्या म्हणाल्या, "विद्यार्थी शुद्ध वाणी आणि स्वच्छ शुद्धलेखन इतकेही शालेय अभ्यासक्रमाच्या शेवटी संपादन करीत नाहीत, असे आढळून येते. आता बऱ्याच शिक्षकांचेही वाचन समजत नाही आणि अक्षर लागत नाही, अशी अवस्था निर्माण झाली आहे. मराठी शब्दांचे उच्चार व लय कशी असावी, वाणीची शुद्धता व मधुरता कशी कमवावी, याविषयी शिक्षण व नित्यपाठ देणे अत्यावश्यक झाले आहे."

"अनेकदा तर असे वाटते की, वाचकाला समजावे म्हणून लिहायचे, हे आजचे काही लेखक व कवी नाकारू लागले आहेत. तसेच दुसऱ्याला समजावे म्हणून बोलायचे असते, हे आपण विसरत चाललो आहोत! आपल्याच पूर्वजांनी केवळ जिव्हेच्या अग्रावर वेदोपनिषदांचे वैभव जागविले आणि अनेक शतके त्यांतील लयीलयींचे आणि आरोह-अवरोहाचे रक्षण केले, हे खरेही वाटेनासे होते."

मराठीच्या सद्यःस्थितीविषयीची कुसुमावतींची ही प्रतिक्रिया अतिशय बोलकी आहे.

**मराठीचे भवितव्य**

मराठी भाषा आणि मराठी वाङ्मय यांची विविध अंगांनी प्रगती व्हावी, या दृष्टीने काही विचार मांडता येतील :-

* आंध्र राज्यातील हैदराबाद येथे 'मराठी महाविद्यालय' गेली अनेक वर्षे उत्तम प्रकारे चालले आहे. परराज्यात (जिथल्या बहुसंख्य नागरिकांची 'तेलुगू' ही मातृभाषा आहे,) हे घडू शकते; तर मग महाराष्ट्रात स्वतंत्र 'मराठी विद्यापीठ'च स्थापन व्हावे; अशा एका मराठी भाषिक विद्यापीठाची गरज आहे. शासनाने हा प्रस्ताव कार्यवाहीत आणावा.

* पदवी वर्ग व प्रशिक्षण वर्ग यांसाठी मराठी हा प्रमुख विषय घेणाऱ्या

व्यक्तींनीच माध्यमिक शाळांतून मराठीचे अध्यापन करावे. कुणीही कुठलाही विषय शिकवावा, अशी पद्धती अशास्त्रीय आहे.

* मराठी माणसांनी मराठीत पत्रव्यवहार करावा. शुद्ध मराठीत बोलावे. ('बाथरूममधल्या वॉश बेसीनपाशी तोंड वॉश करून, फ्रेश होऊन येतो,' हा प्रकार थांबवावा.) आपली स्वाक्षरी देवनागरी लिपीत करावी.

* आपली मुले मराठी माध्यमाच्या शाळेत घालावी. घरी मुलांना मराठीतून गोष्टी सांगाव्यात. 'मनाचे श्लोक' दररोज म्हणायला सांगावेत; तुकोबांचे अभंग शिकवावेत.

* भाषा हे संस्कृतीचे वाहन आहे. मराठी भाषेचा अभिमान म्हणजे मराठी संस्कृतीचा अभिमान होय. मात्र ही प्रादेशिक किंवा संकुचित वृत्ती आहे, असा न्यूनगंड बाळगू नये. फ्रान्समध्ये फ्रेंच भाषेशिवाय चालत नाही. रशियात त्यांचीच भाषा व्यवहारात असते. तेव्हा महाराष्ट्रात मराठीचा आग्रह अभिमानाने धरावा.

* साहित्य, ललित कला, भौतिक शास्त्रे आणि सामाजिक शास्त्रे यांचे लेखन - अध्ययन - अध्यापन - संशोधन - प्रकाशन मराठीतून व्हावे. मराठीचा नवा जागर मराठी माणसांनी सुरू करावा.

* मराठी भाषेचे श्रवण, भाषण, वाचन, लेखन व चिंतन यांच्या समन्वयातून मुलांची भाषिक कौशल्ये वाढीस लागावीत. त्या दिशेने जाणकारांनी प्रयत्न करावेत. शुद्धलेखन - निबंध - घोषवाक्य - गद्य वाचन - पद्य वाचन यांच्या स्पर्धा, वक्तृत्व - नाट्य - संवाद स्पर्धा, काव्यगायन असे उपक्रम या संदर्भात उपयुक्त ठरतील.

* "मी मराठी भाषेचा शिवाजी आहे", असा विष्णुशास्त्री चिपळूणकरांनी व्यक्त केलेला स्व-भाषाभिमान पुन्हा एकदा जागवला पाहिजे.

* 'विज्ञान, तंत्रज्ञान आणि मराठी भाषा' यांचे परस्परसंबंध स्पष्ट करताना, डॉ. जयंत नारळीकर यांनी महत्त्वाचे असे तीन मुद्दे मांडले आहेत :-

सध्याचे विज्ञान युरोपातून आले, म्हणून त्याचे प्राथमिक शिक्षण युरोपीय भाषेतून दिले पाहिजे, हा अट्टाहास चुकीचा आहे. स्वतः विज्ञान हा विषय अमुक एका देशातला, म्हणून त्या देशाचा छाप घेऊन आलेला नसतो. पाण्याप्रमाणे विज्ञानही निर्गुण आहे. न्यूटनने जुन्या इंग्रजीत मांडलेले नियम जर मराठी भाषक अभ्यासकाला मराठीत समजत असतील, तर ते नियम त्याला मराठीतच सांगितले

पाहिजेत. त्यामुळे त्या नियमांची विश्वासार्हता नष्ट होत नाही. त्यांतील तथ्ये शाबूत राहातात.

इंग्रजीतून विज्ञान शिकणाऱ्या मराठी भाषक मुलाला प्रथम इंग्रजी विधानाचे मराठीकरण मनातल्या मनात करून, मग त्याचा अर्थ लावावा लागतो. पुढे त्या विधानाची छाननी करण्यासाठी लागणारे विचारमंथन मराठीतच केले जाते. ही प्रक्रिया मूळ विधान मराठीत असल्यास अधिक सोपी व सुटसुटीत होते.

विज्ञानाचे उच्च शिक्षण आणि संशोधन करताना मात्र इंग्रजीचा अव्हेर करून चालणार नाही, हा दुसरा मुद्दा होय. उच्च दर्जाचे वैज्ञानिक संशोधन राष्ट्राची मर्यादा ओलांडून आंतरराष्ट्रीय स्वरूपाचे असते. तेथे विचारांची देवाण-घेवाण करण्यासाठी इंग्रजी भाषाच योग्य ठरते. इथे इंग्रजीकडे आपण गुलामगिरीची भाषा म्हणून न पाहाता, देशा-देशांना जोडणारी भाषा म्हणून पाहिले पाहिजे.

तंत्रज्ञानाविषयीची ओढ हा तिसरा मुद्दा आहे. ही ओढ निर्माण व्हायला, त्याचे आदान-प्रदान, त्याची माहिती, नव्याची निर्मिती, हे सारे साध्य होण्यासाठी त्या प्रांताची भाषा महत्त्वाची ठरते. म्हणूनच त्याकरिता मराठीचा वापर गरजेचा आहे. शहरी समाज सोडला, तर महाराष्ट्रात अजूनही मराठी हीच सार्वजनिक भाषा आहे. ती टिकून राहाण्यासाठी मराठी भाषेला या नव्या संगणकाच्या युगात संगणकाशी जुळवून घ्यावे लागेल. नवे पारिभाषिक शब्द भाषेला खपवून घेता आले पाहिजेत.

(डॉ. नारळीकरांचा मूळ लेख : 'कथाश्री' दिवाळी अंक : इ.स. २०००)

* "द्रौपदीचे सत्त्व लाभो, माझिया भाषा-शरीरा", ही बा.सी. मर्ढेकरांनी व्यक्त केलेली अपेक्षा लाख मोलाची आहे.

* विद्यार्थ्यांना ग्रंथाभिमुख केले पाहिजे. त्यांच्या मनात पुस्तके वाचण्याची ओढ निर्माण केली पाहिजे. त्यांची पावले ग्रंथालयाकडे वळावीत म्हणून योजना आखावी. उच्च दर्जाची करमणूक आणि जीवनमूल्यांचे संस्कार यांचा समतोल साधणारी पुस्तके विद्यार्थ्यांसाठी उपलब्ध करून दिली पाहिजेत.

या संदर्भात श्री. र.कृ. जोशी यांचे पुढील काव्य सूचक आहे; उद्‌बोधक आहे :- ('भाषा आणि जीवन' : मराठी अभ्यास परिषद पत्रिका, पावसाळा २००१, पृ. ३०)

"बारा स्वर आणि छत्तीस व्यंजनं फक्त.

पण ती मागं पुढं आलटून पालटून लिहिली गेली -
की बरचसं काही सांगून जातात, मराठीत.
ज्ञानेश्वरांच्या हाती, ती ओवी बनतात.
तुकोबांचे अभंग हीच अक्षरे गातात.
एकनाथी भारूड त्यातच वहावत जातं.

टिळकांची सिंहगर्जना, चिपळूणकरांची निबंधमाला; केतकरांचे ज्ञानकोशी भांडार, नि केशवसुतांची तुतारी यातूनच अवतरते.

खांडेकरांची ययाति नि बहिणाबाईंची महति यांतूनच तर कळते.

मर्ढेकरांचा सौंदर्यविचार नि अत्र्यांचा विनोद, यातूनच, यातूनच!"

- उत्कर्षाप्रत पोहोचलेल्या मराठीचे सामर्थ्य आणि सौंदर्य वरील काव्यात मार्मिकपणे व्यक्त झालेले आहे. उद्याच्या मराठीला, फिरून एकदा असे वैभवाचे दिवस दिसतील, असा विश्वास बाळगावा. अर्थात्, हे घडावे म्हणून तुम्ही-आम्ही व्रतस्थपणे प्रयत्न करून, पुढील स्वप्न साकार केले पाहिजे :-

"- हिचे पुत्र आम्ही, हिचे पांग फेडू;
वसे आमुच्या मात्र हृन्मंदिरीं;
जगन्मान्यता हीस अर्पू प्रतापें,
हिला बैसवू वैभवाच्या शिरीं!"

■

६०/१५ भारती निवास कॉलनी, पुणे - ४११ ००४.

## संस्कृतीचे प्रतीक

पुलंच्या 'वंगचित्रे' पुस्तकात शारदेचं सुंदर वर्णन करणारा एक छोटा उतारा आहे. पु. ल. म्हणतात, "सरस्वतीइतके संस्कृतीचे सुंदर प्रतीक नसेल. चिखलातून उगवणाऱ्या कमळाचं आसन, साक्षात माती आणि वाहत्या पाण्याचा आधार. एका हाती ग्रंथ आणि एका हाती मनाचे जाड्य नाहीसे करणारी वीणा सर्व रंगांचे मिलन झाल्यावर निर्माण होणाऱ्या शुभ्र रंगाचे वसन ल्यालेली. शिवाय ही शुभ्रता स्त्री देहावर विलसत असल्यामुळे तिला शारदीय चांदण्याची शीतलताही आहे. सप्तसुरांचा आणि सप्तरंगांचा जिथे आदर होतो, तिथेच मानवी संस्कृती फुलते."

■

**प्रेषक : माधुरी जोशी, पुणे**








पुस्तक परिचय

# शाहजी महाराजकृत 'लक्ष्य लक्षण पदे'

सुमन बेलवलकर

(परीक्षित पुस्तक : शाहजी महाराजकृत 'लक्ष्यलक्षण पदे' संपा. पं. एन्. विश्वनाथन आणि डॉ. राघ. विवेकानंद गोपाल, तंजावर म.स. स.म. ग्रंथालय, तंजावर, २००२, मूल्य रु. ५०/-, पृष्ठे १४१)

तंजावर येथील सरस्वती महाल (मुद्रेतील मूळ शब्द महालय असा आहे) ग्रंथालयाची ज्यांना माहिती आहे त्यांना डॉ. राघ. विवेकानंदगोपाल हे नाव अपरिचित नाही. डेक्कन कॉलेजातील पश्चिम विभागीय भाषाकेंद्रात मुळाक्षरांपासून त्यांच्या मराठी भाषेच्या अध्ययनाला आरंभ झाला. त्यानंतर मध्ययुगीन ऐतिहासिक कागदपत्रांमधल्या मोडी हस्तलिखितांचा अभ्यास करण्यावर त्यांनी विशेष लक्ष केंद्रित केले. सरस्वती महालय ग्रंथालयात मोडी तज्ज्ञ म्हणून नियुक्ती झाल्यानंतर त्यांनी पुणे विद्यापीठातून मराठीत एम्.ए. आणि 'तंजावर मराठी लावणी' या विषयावर पीएच.डी. या पदव्या प्राप्त केल्या. सतराव्या शतकात तिकडे स्थायिक झालेल्या कुटुंबांसाठी आधुनिक मराठीचे वर्ग घेणे, 'ययाति' - 'युगान्त'सारख्या तालेवार साहित्यकृतींचे तमिळ अनुवाद करणे आणि राज्य मराठी विकास संस्थेसारख्या प्रांतीय स्तरावर काम करणाऱ्या संस्थेचे हौशी भाषिक राजदूत होणे अशी मराठी माणसाकडून न होणारी मराठीची अनेक कामे ते करतात. शाहजी महाराजकृत 'लक्ष्यलक्षण पदे' या पुस्तकाचे संपादन हा त्यांच्या उद्यमशीलतेचा अलीकडील आविष्कार आहे.

'लक्ष्यलक्षण पदे' हा तंजावरचे मराठा शासक शाहजी महाराज भोसले यांनी रचलेल्या ९५ शृंगारपर नाट्यपदांचा संग्रह आहे. एकोजीराजे आणि दीपांबा यांच्यापोटी इ.स. १६७० मध्ये शाहजींचा जन्म झाला. १६८४ ते १७१२ या काळात त्यांनी प्रशासक आणि प्रतिभावंत म्हणून कीर्ती मिळवली. त्यांच्या राजकीय पराक्रमाचे वर्णन संपादकांनी सनावळ्यांसह केले आहे. परंतु या राजाच्या

साहित्यिक सृजनतेची साक्ष देणाऱ्या अनेक रचना सरस्वती महालयात आहेत. स्वतः शाहजींना स्वभाषा मराठी तर येत होतीच; पण ते तेलुगु आणि कन्नड या भाषांमध्ये वाढले. आपल्या राज्याची भाषा तमिळ आणि तत्कालीन राजांनी प्रायोजित केलेली संस्कृत यांच्यावरही त्यांचे प्रभुत्व होते. त्यांनी बावीस मराठी, वीस तेलुगु, तीन हिंदी आणि प्रत्येकी एक संस्कृत व तमिळ नृत्यनाट्यांची निर्मिती केली. यामुळे त्यांना 'अभिनव भोज' ही उपाधी सार्थपणे दिली गेली.

शाहजी महाराजांच्या मराठी नृत्यनाट्यांचे वेगळेपण म्हणजे त्यातील चौदा तेलुगु लिपीत आणि आठ बाळबोधात लिहिलेली आहेत. संपादकांच्या माहितीनुसार विष्णुदास भावे यांच्या आधी दीडशे वर्षे मराठी नाट्य व रंगभूमीची निर्मिती करून दाक्षिणात्य देशात शाहराजांनी मराठी वाङ्मयाची प्रतिष्ठा वाढवली. तंजावर ते ओंगोल या तत्कालीन 'कर्नाटिक' प्रांतात रंगभूमीचा विकास प्रथम झाला. विष्णुदासांची रंगभूमी हा नंतरचा टप्पा आहे असे संपादकांचे मत आहे.

नृत्यनाटकांशिवाय शाहराजांनी केलेल्या पदांची रचना पाचशेच्या वर आहे. त्यातील भक्तिपर पदांचा पहिला भाग. 'श्रीत्यागेश पदे' या नावाने सरस्वती महालयाने प्रकाशित केला आहे. त्यागेश हे भोसल्यांच्या कुलदैवताचे - शिवाचे नाव कवीने आपल्या प्रत्येक रचनेत 'अभंग' स्थानी गुंफले आहे. 'लक्ष्यलक्षण पदांचा' विषय शृंगार आहे. तरीही अंती त्यागेशाचे नाव असल्यामुळे ही पदे भक्तीवर अधिकार सांगू शकतात. तेलुगु कवी अन्नमाचार्यादी कवींना शृंगारपर पदरचनेची प्रेरणा देणारी, भानुकवीने रचलेली 'लक्ष्य ग्रंथ रसमंजिरी' शाहराजांसाठीही उपयुक्त ठरली होती. या पदांना शीर्षके असून त्यांच्या राग-तालाचा निर्देश ९५पैकी ५६ ठिकाणी आहे. रागांमध्ये 'लीळाचरित्र' या आद्य मराठी ग्रंथात उल्लेखलेल्या धनाश्री रागांपासून अलीकडे एका तेलुगु चित्रपटामुळे लोकप्रिय झालेल्या शंकराभरण या रागापर्यंत भरपूर विविधता आहे. या पुस्तकाचे प्रकाशक तंजावरचे जिल्हाधिकारी एस्. कोसलरामन् (आय.ए.एस) यांनी उरलेल्या रचनांसाठी योग्य रागरचना शोधण्याचे आव्हान संगीतकारांनी स्वीकारावे, असे म्हटले आहे. सर्व पदांच्या अखेरी शाहजीराजांनी आपल्या पानभर बिरुदांसह 'रसमंजिरी' आणि रसिककर्णामृत टीका' परिशिष्टाप्रमाणे जोडली आहे. लक्षणगीतांविषयीचा अधिक तपशील मिळवण्याच्या दृष्टीने ही टीका वाचण्यासारखी आहे. छत्रपती शिवाजी महाराजांच्या या पुतण्याने घराण्यातील दोन संभाजींच्या साहित्यप्रेमाचे रोपटे तंजावरसारख्या महाराष्ट्रापासून दूर असलेल्या







ठिकाणी वाढवले. संगीत-नृत्य-नाटके आणि काव्यरचना यांच्याद्वारा कलेची जी सेवा त्यांनी केली तिच्याविषयी माहिती या संग्रहाच्या रूपाने मराठी वाचकांपुढे येत आहे. ही गोष्ट निश्चितच स्वागतार्ह आहे.

'लक्ष्य लक्षण पदे' हा संग्रह कलेच्या विविध अंगांना सामावून घेणारा आहे. त्यामुळे त्याचे परीक्षण संगीत, नाट्य, नृत्य, आणि काव्य या निरनिराळ्या पैलूंमधून होऊ शकते. संस्कृत अष्टनायिकांपुरती यातील नायिकांची विभागणी नाही. त्यातही अनेक उपभेद संबंधित पदांसह टीकेमध्ये निर्देशिलेले आहेत. नायिकांप्रमाणे नायकांचे प्रकारही त्यांच्या पोट भेदांसह चर्चिले आहेत. संस्कृत काव्यशास्त्रातील रसव्यवस्थेत प्रधान मानल्या गेलेल्या शृंगाररसाचे विभिन्न आविष्कार या दृष्टीने हा पदसंग्रह पाहण्यासारखा आहे.

या संहितेचा काव्याच्या दृष्टीने विचार करू गेले तर प्रकर्षाने लक्षात येणारी गोष्ट म्हणजे हे काव्य पंडिती आणि शाहिरी अशा दोन्ही वळणांचे दिसते.

कमल विकासते कमनीय रज आले
अमल अलिपंक्ति अतिशयले
सुमनगुच्छ आले. सुंदरारुपपल्लव झाले
विमल पुंस्कोकिल विनवू चला

अशा पंडिती रचना एका काव्यात तर दुसऱ्या काव्यात

पाऱ्यासारखी ढळते नवोढा हे ...
अवलोकनी मुख फिरविते. अन्योन्यभाषणे मौन धरिते
सविनय विडे घे म्हणते. शय्यागृही म्हण जाऊ इच्छिते

असा नायकाला वेडावणारा, आव्हानात्मक शृंगार आढळतो. ही कवने शृंगारपर असली तरी त्यागेशाच्या मुद्रेमुळे भक्ती आणि प्रीती यांचे अद्वैतही काही पदांमध्ये आहे. एका पदात गौरीला उद्देशून

अनेक जनांचे नेत्री पहा
अणुरेणु तोही खुपण
कनकांगी तुझे नेत्रामध्ये आतां
कमनीय शिवमूर्ती कशी राहिली सांग

असा प्रश्न आहे. त्यागेश आणि सामान्य भोगेश यांच्या तुलनेत

चंद्र एक त्यास, तुम्हा
चंद्र शरीरावरी अनेक

सांद्र नीळकंठ त्यास देव
सांप्रत नीलिमा अधरी तुमच्या

अशी निर्भर्त्सना खंडितेने केलेली आढळते.

"निज अवयवांचे ओसरलेले सौंदर्य मंगल उपचारांनी आणि सेवाभावी वृत्तीने भरून काढणारी प्रगल्भा" (पृ.८) हे या संग्रहातले अतिशय सुंदर पद आहे. ते संपूर्ण पदच वाचण्यासारखे आहे.

गर्जितो घन वर्षितो जीवन
विरहिणी विरहीजन मन लाह्या होती

असे विरोधाभासात्मक वर्णन एकीकडे तर दुसरीकडे

इतर कामुक सारे इच्छिले वस्त्रभूषण देताती
सतत अर्धशरीर सतीस दिलहे याने

अशी भावात्म तुलना या पदांमध्ये आढळते. मोकळ्या शृंगाराबरोबरच

अतिपतिव्रता म्हून (म्हणून) मज
अखिल जन मानितात सदा

अशी पातिव्रत्याची प्रतिष्ठा व्यक्त होते. त्याच पतिनिष्ठेतून

अकलंक नाथ घरास आला
अति अनादर म्यां केला

असा अनुताप प्रकट झालेला दिसतो.

चित्री रूप पाहिले त्यांचे
चित्त स्थिर नाही राहते माझे काय यास करूं?

अशी काव्यात्म व्याकुळता नाट्यानुकूल रचलेच्या रूपात शब्दबद्ध झालेली एकाच कवनात दिसते; तर दुसऱ्या पदात

घरची वस्त्रभूषणे वेश्यास देतो
घरच्यांनी पूसिल्यां मज ठाऊक नाही म्हणतो

अशी प्रापंचिक तक्रार आहे.

शृंगाराच्या अशा विविध अभिनयानुकूल छटांबरोबरच चित्रकविता, नवरत्ने, फळे, बारा राशी यांच्यासंबंधीच्या पदरचना कविकौशल्याची साक्ष देतात. उत्तर भारतात आढळणारी 'फाग' रचना तसेच गुलाल उत्सवपदे शाहजी राजांनी केली आहेत. भाषाप्रभू शाहजींनी तमिळ, तेलुगु आणि मराठी या तीन भाषांमध्ये मिश्र स्वरूपाचे 'दरुपद' रचले आहे. "भारताच्या नाट्यशास्त्रात नाटकातील




अनुक्रमणिका

गीतांस 'ध्रुवा' अशी संज्ञा दिली आहे. संस्कृत भाषेतील ध्रुवा तंजावरी पदसाहित्यात आणि नाटकात 'दरु' नावाने येतो" असे श्री. रं. कुलकर्णी यांचे मत आहे. मध्ययुगात सामंतशाही स्वरूपाच्या संस्कृतीत आविष्कृत झालेली ही रचना पाहता

शाह पार्थिवनंदन विक्रम स्त्रीमुख
जय विभव स्वभानु तेज
बहुधान्य साधारण सौम्यगुण
भव्य शोभकृत त्यागेश्वर आम्ही

ही शाहजी महाराजांनी धारण केलेली शब्दभूषणे त्यांना शोभतात असे वाटते.

कोणत्याही साहित्यकृतीला सामाजिक संदर्भ कमीअधिक प्रमाणात चिकटलेले असतात; तसे ते या पदांमध्येही पहायला मिळतात.छिटाच्या वस्त्राचा उल्लेख (पृ.२३) यादवकाळापासून चालत आलेले पाटावू रेशमी वस्त्र (पृ.२५), बाळंतिणीला तेल-हळद लावण्याची पद्धत (पृ.४४), लग्नाचे निरनिराळे विधी (पृ.५३), होन हे नाणे चलनात असणे. (पृ.८१) आणि दागिन्यांमध्ये 'वीटी' (अंगठी) या गुजराती शब्दाचा उल्लेख असे काही तत्कालीन सामाजिक जीवनावर प्रकाश टाकणारे निर्देश या दृष्टीने लक्षणीय आहेत.

या ग्रंथाचे स्वरूपच असे आहे, की याचे परीक्षण करण्यापेक्षा त्याचा मराठी वाचकांना परिचय करून देणे अधिक उचित वाटावे. त्या क्षेत्रातील प्रतिभावंत कलाकारांनी या रचनांचा अभ्यास करून त्यांचे सादरीकरण केल्यास लेखनकालानंतर जवळजवळ २९० वर्षांनी त्या प्रकाशात आल्याचे सार्थक होईल.

भूर्जपत्रावर तीनेकशे वर्षांपूर्वी तेलुगु लिपीत लिहिलेल्या या पदांचे लिप्यंतर आणि तंजावरसारख्या ठिकाणी देवनागरीत अक्षरजुळणी या दोन मोठ्या अडचणी आल्याचे या ग्रंथाच्या छपाईवरून लक्षात येते. धर्मकणाऐवजी कर्मकण (पृ.१) ही चूक दक्षिण भाषकांच्या हातून होऊ शकते. विडाचा लवून दिल्हा, भावज याजावा, हा कां मारिल्या या भाषेच्या अनभिज्ञतेपायी घडलेल्या किरकोळ चुका आहेत. अक्षरजुळणीतही श्याळ (स्थळ पृ.२८), अंगनेंचे - अंगनंचे (पृ.३९) भैगी (पृ.३९), दनी (पृ.४७), सर्प ठसाया (पृ.८०), प्राणेस भोटवी (पृ.८२) वनजनभिमुखी (पृ.९७) असे मुद्रणदोष पुढील आवृत्तीत काढून टाकता येण्यासारखे आहेत.

केवळ पन्नास रुपये इतक्या अल्प मूल्यातही या पुस्तकाचे मुखपृष्ठ कलात्मक भावमुद्रांनी सजविण्याचे औचित्य संपादक-प्रकाशकांनी दाखवले आहे. सरस्वती

महालयातील हा नजराणा सामान्य मराठी वाचकांना सादर झाल्यानंतर 'लक्ष्यलक्षण पदे' आणि त्याआधीची शाहजीराजेकृत 'श्रीत्यागेशपदे' यांचा नृत्य-नाट्यात्म आविष्कार मराठी कलावंतांनी केला तर काळाचे आणि प्रदेशातले अंतर मिटवल्याचे श्रेय त्यांना मिळेल आणि या ग्रंथाच्या संपादकांचे श्रम सार्थकी लागतील.

■

२/एफ-४४, सुंदरनगरी, ३०८, सोमवार पेठ, पुणे ४११ ०११.

**साद आणि प्रतिसाद**

## सूनबाईच्या भाषाशिक्षणाचा एक वेगळा संदर्भ

**सीताराम रायकर**

'भाषा आणि जीवन'चा अंक पाहिला. त्यातील द.दि. पुंडे यांचे समर्पक संपादकीय वाचले. मला ते खूपच आवडले. या निमित्ताने एक गोष्ट आठवली. कै. मे.पुं. रेगे एकदा मला म्हणाले होते की बेळगाव आणि महाराष्ट्र-कर्नाटक सीमेवरच्या अनेक भागांत अशी पद्धत होती की मुलगे कानडी माध्यमाच्या शाळेत जात आणि मुली मराठी माध्यमाच्या शाळेत. याचे कारण मुलींची लग्ने बहुतेक महाराष्ट्रात आणि मराठी भाषिक घरांत होत. त्यांना मराठी येणे आवश्यक असे. मुलग्यांची गोष्ट अशी नव्हती म्हणून ते कानडी माध्यमाच्या शाळांत जात.

इटलीमध्ये दुसऱ्या महायुद्धात अमेरिकेने आपले सैनिक इटालियन सैनिकांच्या पिछाडीवर उतरवले होते. त्यांनी आजूबाजूच्या प्रदेशात पसरून शत्रूच्या पिछाडीवर हल्ले करायचे, घातपात घडवून आणायचे, अशी योजना होती. ती यशस्वी व्हायची तर सैनिकांना इटालियन भाषा मातृभाषेच्या सफाईने यायला हवी - विशेषतः बोलता यायला हवी. त्यासाठी mim-mem पद्धत उपयोगात आणण्यात आली. MIM म्हणजे Mimic आणि MEM म्हणजे Memory. या मोहिमेपुरते बोलायचे तर ती पद्धत अगदी परिणामकारक ठरली. नंतर केलेल्या विश्लेषणात असे जाणवले की mim-mem यशस्वी होणे अपरिहार्य होते; कारण जिवाशी खेळ होता; जीवन-मरणाचा प्रश्न होता. पुंडे यांच्या लेखातील सूनबाईंच्या दृष्टीने सुद्धा जीवनमरणाचा प्रश्न उभा राहिला असणार.

■

**विजय अपार्टमेंट्स, ३९/३५ कर्वे रस्ता, पुणे ४११ ००४.**



अनुक्रमणिका






# भाषा विरुद्ध भाषा

सानिया

[दिल्लीजवळच्या 'निमराण' येथे मे २००२च्या सुमारास "At home in the world - International Festival of Indian Literature" या विषयावर एक संमेलन झाले होते. त्या संमेलनाचा "भाषा विरूद्ध भाषा" या शीर्षकाचा इंग्रजीतून लेखन करणाऱ्या शशी देशपांडे यांचा वृत्तांत लेख 'मिळून साऱ्याजणी' - जून २००२ मध्ये प्रसिद्ध झाला होता. या वृत्तांतामध्ये प्रादेशिक भाषा, इंग्रजी भाषा यांच्या संदर्भातील काही प्रश्नांची चर्चा त्यांनी केली होती. या लेखाला अनुसरून मराठीतील प्रसिद्ध लेखिका सानिया यांनी एक प्रतिक्रियात्मक लेख लिहिला होता तो येथे जाणीवपूर्वक घेतला आहे. या लेखाच्या निमित्ताने "आपण मराठीतून किंबहुना मातृभाषेतून का लिहितो" या संदर्भातील प्रतिक्रिया 'भाषा आणि जीवन'मध्ये व्यक्त कराव्यात असे आवाहन करत आहोत - संपादक]

भारतीय लेखकांचं संमेलन आणि त्या निमित्तानं झालेल्या चर्चा, वाद हे काही विचारांना चालना द्यायला कारणीभूत झाले. या अवधीत इंग्रजी भाषा विरूद्ध इतर भारतीय भाषा असा एक सूर ऐकू आला. खरं तर 'भाषा विरूद्ध भाषा' असं उद्‌भवायलाच नको. 'भाषा आणि भाषा' हे जास्त संयुक्तिक आहे. जगात भाषा अनेक, भारतातही भाषा अनेक हे वास्तवच आहे. यात आपलंच तेवढं खरं आणि श्रेष्ठ असा पवित्रा घेतला की विरूद्धची भाषा येते. त्याअलीकडची परिस्थिती काय सांगते?

आज जागतिक भाषा म्हणून इंग्रजीला स्थान आहे हे नाकारता येतच नाही. ती यावी, ज्ञानभाषा म्हणून ती प्रचलित असता आपण त्यात ज्ञान मिळवावं, त्याचा आयुष्य समृद्ध करून घ्यायला उपयोग करून घ्यावा असं वाटणं साहजिकच आहे. त्याही पलीकडे आपल्याच देशभरच्या शिक्षित, शहरी, निमशहरी लोकांच्या संपर्काचीही ती भाषा आहे.

तरीही आपण ज्या प्रदेशात ज्या घरी जन्माला आलेलो असतो ती आपली एक मातृभाषा असते. तिला इंग्रजीच्या पुढ्यात लढायसाठी उभं करण्यात काय साधणार आहे? आपली मातृभाषा आपल्याला यावीशी वाटत असेल, ती टिकावी, तिचा विकास व्हावा असं वाटत असेल तर आपणच ती वापरायची आहे. ती शक्य त्या चांगल्या, निर्भेळ स्वरूपात बोलायची आहे, वाचायची आहे, लिहायचं आहे त्या भाषेत. समाजजीवन - संस्कृती याच्या अनुषंगानं ज्या खुब्या असतात आपापल्या भाषेत त्या जोपासायच्या आहेत.

हे सर्व करतानाही इंग्रजीचा वापर आपल्याला जगायच्या संदर्भात, मिळवताना, आपापले प्रदेश ओलांडून जाताना करता येतोच. तो नाकारणं म्हणजे आजच्या जगात आपलं क्षेत्र संकुचित, कोतं करून घेणं आहे. तसं जगता येईलही पण ते दर्जाहीन, निकृष्ट जगणं असेल.

मुळात एक विरूद्ध दुसरं असा दृष्टिकोन बाळगायचंच कारण दिसत नाही. आपल्या कुवतीचाच विचार केला तरी आपल्याला एकीहून अनेक भाषा सहज शिकता येतात. त्या चांगल्या आत्मसात करणं, त्यात बोलणं - लिहिणं - वाचणं सारं काही शक्य असतं. कुवत ही वाढवण्याचीच गोष्ट असते. आपण म्हणतो की हल्लीची पिढी फार हुशार आहे, त्यांना अनेक गोष्टी लवकर येतात वगैरे. खरी गोष्ट अशी सिद्ध झालेली आहे की फार लहान वयातच शिकण्याची, आत्मसात करण्याची ताकद असते. योग्य त्या शिक्षणपद्धतीमुळे कितीतरी गोष्टी - यात भाषा, कला, खेळ, सगळे विषय आले - लवकर शिकता येतात. याबरोबरीनं आपल्याला खूप, अधिक शिकायचं आहे, ही भावना सतत जागृत व्हायला हवी. आपलं तेवढंच श्रेष्ठ, अंतिम सत्य, असला आव न धरता आपल्या बरोबरीनंच इतरही खूप काही आहे, ते जाणून घेण्याची उत्सुकता आणि त्याबद्दलचा आदर बाळगणं हे गुण शिकवण्याची आवश्यकता आहे. ते जमलं की आपोआपच एकीहून अधिक भाषा येणं, आपली मातृभाषाही संपन्न असणं, बरोबरीनं इंग्रजीही आत्मसात होणं ही एक सहज घडणारी प्रक्रिया असेल.

अर्थात तिथपर्यंत पोचायला अजून अवकाश आहे. कारण तशी प्रक्रिया सुरूही झाल्याचं निदान मोठ्या प्रमाणावर काही दिसत नाही. एक श्रेष्ठ, दुसरी कनिष्ठ. एक हवी का दुसरी अशा चक्रातच जोपर्यंत समाज अडकलेला आहे तोपर्यंत कुठली 'बाजू' जिंकेल ते सांगता येणं कठीण. यात सर्वसामान्य लोकांना काहीतरी निर्णय घेणं भागच पडत असतं. म्हणजे मुलांना कुठल्या माध्यमात

शिकवायचं? तर पुढे पैसा-नोकरी-संधी याचा विचार करता, इंग्रजीच. असं म्हणून लहान वयातच त्या भाषेतून ज्ञानाची ओळख. मग मातृभाषेची जोपासना असा काही खास प्रयत्न नसल्यानं ती उणीव. पर्यायानं संवाद साधणं, स्वतःला आविष्कारित करणं, संवेदनशीलता वाढवणं यासाठी आवश्यक अशी जी स्पष्ट, स्वच्छ विचारसरणी तिचा पूर्ण अभाव. कारण मुळात कुठल्याच भाषेवर प्रभुत्व नसेल; भाषा खुलावी असं वातावरणच नसेल तर व्यक्तीच्या भावभावनांचाही आविष्कार होणार कसा? माणसामाणसातला संवादच सशक्तपणे होऊ नाही शकला तर अर्थपूर्ण नाती बांधलीच कशी जाणार? आणि आयुष्यालाच जर अशी घनता नसेल तर माणसांचा समूह समाज म्हणून उभा राहीलच कसा? त्याची प्रगती हा तर दूरचाच पल्ला झाला.

तरीदेखील थोड्या प्रमाणावर का होईना काही लोक काहीतरी साधत असतातच. प्रादेशिक भाषांच्या भविष्याविषयी चिंता व्यक्त केली गेली तरी त्यात लेखन होतच असतं. पुस्तकं प्रसिद्ध होतात. म्हणजे काही लोक ती वाचत असतातच. खरं तर भारतातल्याच भाषा घेतल्या तरी एकीची दुसरीशी तुलना ही व्यापकपणे करणं कठीणच आहे. तशी देवाण-घेवाण असते कुठं? दोन भारतीय भाषा सहजपणे, संपूर्णपणे जाणणारं कुणी असून नुसतं भागत नाही, त्या माणसाला साहित्याचं अंग असावं लागतं तरच मग भाषांतराचं काम तडीला नेलं जाणार. शिवाय संपूर्ण पुस्तक व्यवहार हा आपल्या देशात फायद्याचा व व्यवहार म्हणून केला जाणारा असा नाही. लेखनावर जगणं कठीण. मग भाषांतर करणं हा एक नाव - पैसा मिळवून देणारा व्यवसाय झाला तरच तो घडणं शक्य आहे. म्हणजे त्यासाठी हुशार बुद्धिमान मुलामुलींना भाषांतर करण्याचं प्रशिक्षण मिळालं, त्यांनी तो पूर्णवेळचा व्यवसाय म्हणून केला तर एका भाषेतून दुसरीकडे साहित्य जाईल. पण त्यासाठी अर्थात पुस्तकांचा खप मोठा असायला हवा. म्हणजे बऱ्याच लोकांनी वाचायला हवं. अर्थात शिक्षणप्रसार अधिक हवा एवढंच नाही तर वाचनसंस्कृती वाढायला हवी. हे सगळं चित्र गोंडस असलं तरी वास्तव नाही व लवकरच तसं काही होईल अशी शक्यताही दिसत नाही.

म्हणजे मग प्रादेशिक भाषांतलं लेखन हे मर्यादित वाचकवर्गापुरतं राहणार हे उघड आहे. ते तसंच स्वीकारायला हवं. त्याबरोबरीनं इंग्रजी ही आपल्या देशात रुळलेली भाषा आहे आणि त्या भाषेत लिहिण्याची निवड एखाद्या व्यक्तीला करता येऊ शकते हेही समजून घ्यायला हवं. इंग्रजी जागतिक स्तरावरील भाषा



अनुक्रमणिका

असल्यामुळे इंग्रजीत लिहीणाऱ्या भारतीय लेखकांना अधिक प्रदेशापलीकडचे वाचक मिळणंही साहजिकच आहे. त्यांचा बोलबाला होणं, त्यांना जागतिक दर्जाचे पुरस्कार मिळणं, थोडक्यात त्यांनी आंतरराष्ट्रीय होणं हेही किती अपरिहार्य आहे.

अशा वातावरणात चित्र दिसतं ते असं की इंग्रजी लिहून देशापलीकडच्या वाचकवर्गापर्यंत पोचणाऱ्या लेखकांना वाटतं की आपण लिहितो ते प्रादेशिक स्तरापेक्षा अधिक व्यापक, जागतिक आणि भारतीय पार्श्वभूमीवरचं असलं तर प्रातिनिधिकही आहे. यातल्या काहींना कदाचित प्रादेशिक भाषेतल्या साहित्याची ओळखच नसणं शक्य आहे. विशेषतः इंग्रजीच वापरणाऱ्या तरूण, आजच्या पिढीतल्या लेखकांना व्यावहारिकदृष्ट्या खरं तर काही अडतही नाही. इंग्रजी लेखक म्हणून त्यांना व्यापक व्यासपीठ मिळतं. पैसा, नाव, प्रसिद्धी, मान वगैरेही. पण त्याबरोबर भाषा माहीतही नसता त्यातल्या साहित्यावर टीका करणंही त्यांच्या अधिकारात नसावं.

प्रादेशिक भाषातल्या लेखकांचं व्यासपीठच मर्यादित आहे आणि ते तसंच राहणार. त्यातल्या कुणी अगदी उत्तम दर्जाचं लिहिलं तरी ते जोपर्यंत, भाषांतराद्वारे का होईना, जागतिक स्तरावर जात नाही तोपर्यंत ते तितकं श्रेष्ठ आहे हे इतरांना कळायचं तरी कसं? तेव्हा एक तर ते तसं न्यायला हवं नाहीतर आहे त्या वास्तवाचा स्वीकार करायला हवा. इंग्रजी लेखकाला मिळणारे मानसन्मान आणि मानधन यांची असूया वाटणं अगदी व्यर्थच आहे.

आपली निदान एक भाषा आणि इंग्रजी अशा दोन भाषांतलं साहित्य वाचलं तर वाचकाच्या दृष्टीनं काय दिसतं? प्रादेशिक भाषांत जसे बरे-वाईट दोन्ही लेखक असतात तसेच इंग्रजीतही असणारच. आपापली आवडही असतेच. त्यानुसार मग भाषा वेगळी, व्याप्ती वेगळी, भागधेय वेगळं हे समजून स्वीकारायलाच पाहिजे.

इंग्रजीत लिहिणारी, नाव कमावलेली शशी देशपांडे. तिची मी, साहित्य अकादमी पुरस्कार मिळाल्यावर मुलाखत घेतली. माझी मैत्रीणच झाली ती त्यानंतर. तिच्या एका इंग्रजी कादंबरीचा मी मराठीत अनुवादही केला. इंग्रजी भाषा तिनं आविष्कारासाठी निवडलेली भाषा आहे. मराठी-कानडी दोन्ही भाषांचा वारसा तिला आहे. ती लिहिते ते या प्रदेशातलंच असतं. मला वाटतं की ती मराठीत लिहीत असती तर आमच्याबरोबरच असती. मागेपुढे म्हणूया हवं तर. पण आमच्याच वाटेवर. आम्ही म्हणजे, मराठीतून कथा-कादंबऱ्या लिहिणाऱ्या आम्ही सगळ्या.

ती इंग्रजीत लिहिते तेव्हा तिचा वाचकवर्ग प्रदेशात आणि त्यापलीकडचाही आहे. आमचा मराठीपुरताच मर्यादित. तिच्या इंग्रजी कादंबऱ्या इंग्लंडहून प्रकाशित झाल्या की त्याची युरोपीय भाषात भाषांतरं होतात. आमच्या लेखनाला ते भाग्य लाभत नाही. कुणी आपणहून कष्ट घेऊन रस दाखवला तर इतर भाषांत अधूनमधून जातं आमचं लिखाण. आम्हांला आमच्या प्रदेशातले मानसन्मान, पुरस्कार मिळतात तर तिला अधिक व्यापक स्तरांवर. पण हे सगळं साहजिकच नाही का? तिनं इंग्रजी निवडली आणि मी मराठी, तेव्हाच आमचे रस्ते वेगळे होते. तिला इंग्रजीतून आविष्कार करायला जितकं साहजिक वाटलं तितकंच मला मराठीतून करायला.

महाराष्ट्र सोडून आज मला जवळपास तेवीस वर्षं झाली. भारतातल्या निरनिराळ्या प्रांतांत आणि परदेशांतही राहायची संधी मला मिळाली. प्रवासाची तर खूपच. अमराठी माणसाशी लग्न केल्यानं नाती जोडली गेली तीही माझ्या भाषेपलीकडे. स्वतःचा प्रदेश सोडल्यानं मित्रत्वाची अनेक नाती लाभली ती देखील मराठीपलीकडची. तरीदेखील इतकी वर्षं सातत्यानं मला मराठीतच लिहावंसं वाटलं आणि त्याची कधीही रुखरुख वाटली नाही. मराठीतून आविष्कार करणं ही माझी निवड आणि निकड आहे खरीच, पण इंग्रजी ही माझ्या आयुष्यातली अगदी जवळची भाषा आहे. कदाचित वापराच्या दृष्टीनं मी मराठीपेक्षा इंग्रजीच जास्त हाताळत असेन. संभाषण, वाचन, सिनेमा, कार्यक्रम पाहणं आणि पत्रलेखन या साऱ्यातच. तरीही लिहिताना मी मराठीत आविष्कार करते. त्या अनुषंगानं येणारं, म्हणजे माझं लेखन हे एका विशिष्ट प्रदेशातल्या ठरावीक लोकांपर्यंतच पोचतं. त्या सीमित जगापुरतीच माझी ओळख राहणार हे सारं मला मान्य आहे.

याला दुसरा पर्यायही नसेल कदाचित, पण मला भाषावैविध्यानं नटलेल्या या जगात इतकी सगळी मंडळी वेगवेगळ्या तऱ्हेनं लिहितात आणि आपणही एक लिहिणारी म्हणून त्या गटात मोडतो ही भावना सुखकारक वाटते. रस्तेच वेगळे म्हटल्यावर एकाची दुसऱ्याशी तुलना करून फारसं साधत नाही. इंग्रजीत अमुक एक आहे, मराठीत ते कमी आहे असं म्हणणंही मला गैरलागूच वाटतं. मराठीच्या व्याप्तीपुरतं ते किती, कशा उंचीचं आहे हे महत्त्वाचं. मराठीची ही व्याप्ती एका देशातल्या एका प्रदेशापुरतीच आहे हे वास्तव आहेच. प्रादेशिक भाषेत लिहिणाऱ्यांनी आणि इंग्रजीतून लिहिणाऱ्यांनीही एकमेकांची दखल घेतली,

माहिती करून घेतली, आदर आणि उत्सुकता दाखवली तर एकमेकांचे प्रश्न समजून घेणं सोपं जाईल कदाचित; पण ते तसं घेणं सहजसाध्य असेलच असं वाटत तरी नाही.

■

**(पूर्व प्रसिद्धी : 'मिळून साऱ्याजणी' जुलै २००२, पृ. ३१ ते ३३)**

**२०७, निर्मला प्लाझा - बी ए - १, भुवनेश्वर - ओरिसा ७५१ ००९.**

**साद आणि प्रतिसाद**

# 'कानडा' व 'कर्णाटकु' या शब्दांचे अर्थ

**द. दि. पुंडे**

"पांडुरंगकांती दिव्य तेज झळकती......." या अभंगातील "कानडा वो विठ्ठलु कर्णाटकु । तेणें मज लाविला वेधु ।" या चरणांचा एक वेगळाच सांगितला गेलेला अर्थ माझ्या स्मरणात आहे. हा अर्थ मला माझ्या आईने सांगितल्याचे आठवते. (माझी आई बऱ्यापैकी बहुश्रुत होती. वाचनातून आणि बोलण्याऐकण्यातून जे ज्ञान ती मिळवी, ते प्रसंगी वापरण्याची एक युक्तीच तिला अवगत होती.) तिने असा अर्थ सांगितल्याचे आठवते की 'विठ्ठलाचे नाम माझ्या कानात सदैव अडकून राहिलेले, कर्णांमध्ये अटकून राहिलेले आहे. त्याच एका नामाचा मला वेध लागलेला आहे.'

उघडच आहे की एखाद्या गोष्टीचा वेध लागला की त्या गोष्टीचा विचार सतत मनात येत राहतो. त्या गोष्टीचे नाम मनात घोळत राहते आणि कानात ऐकू येत राहते. याच अभंगात पुढे येणाऱ्या "शब्देवीण संवादु......" किंवा "परेही परतें बोलणें खुंटलें' यांसारख्या उल्लेखांमुळे 'कानडा' व 'कर्णाटकु' चा वर सांगितला गेलेला अर्थ पटू लागतो आणि मग अर्थातच या अभंगापुरती तरी 'कानडा' व 'कर्णाटकु' ही पदे प्रदेशवाचक नामे पाहात नाहीत.

माझ्या आईने सांगितलेल्या या अर्थास कै. विष्णुपंत महाजन यांनी दुजोरा दिल्याचेही आठवते. या अर्थाचा विचार करण्यास हरकत नसावी.

(आईने मला सांगितलेला हा अर्थ नेमका कोणी व कोठे प्रतिपादिलेला आहे, याबाबत जाणकार विठ्ठल दैवत अभ्यासकांनी माहिती दिल्यास, मी आभारी होईन.)

■

**४/९ अर्चनानगर, एरंडवणा, पुणे ४११ ०३८.**

# 'ऋतुचक्रा'तील मानवी जीवनचक्र

शकुंतला क्षीरसागर

दुर्गाबाई भागवतांच्या 'ऋतुचक्र' या निसर्गवर्णनपर ललितनिबंधांच्या पुस्तकाचे वेगळेपण दुर्गाबाईंच्या सूक्ष्म निरीक्षण शक्तीत जसे आढळते तसेच ते निरीक्षण वाचकांपर्यंत पोचवण्यासाठी योजलेल्या काव्यात्म शैलीतही आढळते. रूप, रस, गंध, ध्वनी आणि स्पर्श या ऐंद्रिय संवेदनांना आवहन करणारी; नाद आणि लय यांचा प्रत्यय देणारी वर्णने या पुस्तकात जागजागी आढळतात. या पुस्तकाचे आणखी एक वैशिष्ट्य आहे. ऋतुपरत्वे सृष्टीत होणाऱ्या बदलाचे रूप रेखाटण्यासाठी त्यांनी उपमा, उत्प्रेक्षा, रूपक, अपन्हुती यासारख्या अर्थालंकारांची योजना केली आणि त्यातून मानवी जीवनातल्या वेगवेगळ्या भावभावनांचे आणि अवस्थांचे अत्यंत हृद्य दर्शन वाचकांना घडवले, हे ते वैशिष्ट्य होय. अशा काही वैशिष्ट्यांचा विचार या टिपणात केला आहे.

जीव-सृष्टीची - (त्यात मानवी जीव अर्थातच येतात.) पहिली अवस्था म्हणजे गर्भावस्था. त्या अवस्थेत गर्भिणीच्या अंगावर एक प्रकारचे तेज दिसते. ज्येष्ठ महिन्यात संध्याकाळी ढगांमधून पिवळ्या रंगाचा प्रकाश पृथ्वीवर पडतो. तो पाहून दुर्गाबाईंना वाटते, की "हा पिवळा प्रकाश नव्हे तर विश्वजननीच्या अंगावर उमटलेली ही सुंदर गर्भच्छाया आहे. कारण या वेळी सृष्टीत सगळीकडे नवजननाचा सोहळा चालू असतो." (पृ. ३१) येथील 'अपन्हुती' या अलंकारातील मोहकता आणि विशालता स्तिमित करणारी आहे.

कार्तिकात फणसाला नवी पालवी येते. त्या पानांवर एक प्रकारचा तजेला येतो. फळे धरण्याच्या अवस्थेतले फणसाचे झाड पाहिल्यावर, गर्भिणीच्या अंगावर दिसणाऱ्या गर्भतेजाची आणि तिच्यातला पोरपणा जाऊन तेथे आलेल्या प्रौढपणाची गंभीर अभिव्यक्ती फणसाच्या पालवीत झाली आहे असे दुर्गाबाईंना वाटते. त्या लिहितात, "फुले नसली तरी त्याची पाने सुंदर गर्भच्छाया अंगावर धारण करून गंभीरपणे उभी आहेत. (पृ. ७४)

स्त्री-जीवनातल्या वेगवेगळ्या अवस्थाही दुर्गाबाईंनी निसर्गामध्ये पाहिल्या आहेत.





अनुक्रमणिका

खुरचाफ्याची झाडे आषाढात बहरतात. पण भाद्रपदातही झाडावर काही फुलं दिसतात. झाडावर रेंगाळणारी ही फुले म्हणजे, "जणू ते या झाडाचे डोळेच असावे. सासरी जाता जाता मागे वळून आपल्या माहेरच्या गोतवळ्याकडे वारंवार बघणाऱ्या ग्रामकन्येसारखे हे झाड आता वाटते आहे" असे दुर्गाबाई म्हणतात. (पृ. ५८) 'कन्या सासुरासी जाये, मागे परतोनी पाहे' या ओळींचे स्मरण येथील उत्प्रेक्षा या अलंकाराच्या योजनेने होते.

आषाढात वडाच्या झाडाला आलेली फळे श्रावणातही दिसतात. ती खाण्यासाठी पोपट, कावळे हे पक्षी येत असतात. ते पाहून दुर्गाबाईंना वाटते की "झाड कसे पाखरांच्या गजबजाटाने भरून गेले आहे! त्याला स्वतःचे व्यक्तिमत्त्व ते भव्य असूनही उरलेले नाही. लेकुरवाळीसारखी त्रेधा त्याची झाली आहे. (पृ. ४७)

नटणे ही स्त्रीची एक उपजत प्रवृत्ती आहे. उंची अलंकार घेण्याची ऐपत नसली तरी जे परवडतील ते अलंकार लेवून स्त्रिया नटतात. अशी नटणारी स्त्री भाद्रपदात बहरणाऱ्या गवती वनस्पतींत दुर्गाबाईंनी पाहिली. त्यांनी म्हटले आहे, "अगदी लहानातल्या लहान वनस्पतीसुद्धा कशा बहराला आल्या आहेत. सणासुदीच्या प्रसंगी गरिबातल्या गरीब स्त्रियासुद्धा काचेच्या मण्यांचे का होईनात पण दागिने घालून मिरवतात, जुन्या लुगड्याचाच का होईना पण लफ्फेबाज पदर काढून डौलाने चालतात तसेच या गवती वनस्पतींचे आहे." (पृ. ५४) समाजाभ्यासक दुर्गाबाईंच्या या निरीक्षणाचा किती मार्मिक प्रत्यय या उपमेने येतो!

फाल्गुनात बहुतेक झाडांवर नवी पालवी भराभर फुटते. ती पाहून "झाडाझाडावर कोवळ्या पालवीची लाजरी हिरवळ अंग चोरून उभी राहिली आहे" असे दुर्गाबाईंनी म्हटले आहे. (पृ. ११४) यातल्या काव्यात्मतेला दाद द्यायलाच हवी! कार्तिकाची आवडती झाडे म्हणजे तुळस आणि आवळी. या दोन्ही झाडांचे वर्णन करताना दुर्गाबाई म्हणतात "या वेळी तुळस मंजिऱ्यांनी नटलेली, तर आवळी पारांचा पसारा कमी करून फळांचे पोपटी, गुलाबी घोस अंगावर लेऊन उभी असलेली. या दिवसातल्या आवळीकडे पाहिले की, मला लेण्यातल्या कटिखांद्यावर, हातात, पायात व गळ्यात ठसठशीत अलंकार घालून डौलात उभ्या असलेल्या गंभीर व नग्न स्त्रीमूर्तीची आठवण होते." (पृ. ७२-७३)

काटेसावरीचे झाड पौषात निष्पर्ण असते. पण त्या झाडाच्या खडबडीत

काटेरी फांद्यातही दुर्गाबाईंना अभिनयनिपुण कलावतीचे विभ्रम दिसतात. त्यांनी म्हटले आहे, "या झाडाच्या उर्ध्वगामी डहाळ्या कशा कलात्मकतेने मुरडल्या आहेत! जणू एखादी कुशल नर्तकी सस्मित वदनाने कमरेला किंचित बाक देऊन एक हात कमरेवर ठेवून दुसऱ्या हाताच्या मुद्रेने 'पुढे काय' अशा तऱ्हेचा खेळकर अभिनयच करते आहे, असा मला नेहमी भास होतो." (पृ. १००)

बालकाची वेगवेगळी रम्य रूपे दुर्गाबाईंना निसर्गात दिसतात. माडाच्या पानांची विशिष्ट ठेवण आणि त्यावरची बारमास हिरव्या फळांची दाटी पाहिल्यावर त्या म्हणतात, "पल्लवांचा नखरा त्यांना माहीतच नाही जसा. पण फाल्गुन लागला की त्यांच्या माथ्यावर अधिक फिक्या रंगाचे जावळ भुरभुरल्यासारखे वाटते." (पृ. ८)

करंजाचे झाड चैत्रात फुलते. या झाडाच्या फुलांच्या रूपात दुर्गाबाईंना बाल घनश्यामाचे दर्शन होते. त्या म्हणतात, "करंजाच्या फुलांचे रूप अलौकिक असते. अगदी नखाएवढी कळी; करंजीच्याच आकाराची, पांढरी, हिरवा परकर नेसलेली. पण फूल उमलले की किती निराळे दिसते. आत एक निळी जांभळी नाजूक सुंदर कळी आणि तिच्या डोकीवर अर्धवर्तुळ अशी पांढरी टोपी. जणू काही टोपडे घातलेला बाल घनश्यामच या फुलांच्या रूपात अवतरला आहे!" (पृ. ९)

"भाद्रपदात उमलणाऱ्या तिळाच्या निळ्या जांभळ्या फुलाची एक पाकळी चोच फुटल्याप्रमाणे बाहेर पडलेली असते ती पाहिल्यावर लहान मूल फुरंगटून वरचा ओठ बाहेर काढते तसेच वाटते" (पृ. ५५) असेही त्यांनी एकदा म्हटले आहे.

आश्विन लागला म्हणजे पानोपानी फुललेला हादगा पाहून दुर्गाबाईंना वाटते की, "करंज्याच्या आकाराच्या आपल्या चिमुकल्या मुठी त्या झाडाने उघडल्या आणि आश्विनाचे रहस्य उघडे केले. (पृ. ६१)

आश्विनातल्या रात्री उत्तरेकडच्या आकाशात दिसणाऱ्या ध्रुवाच्या ताऱ्याभोवती फिरणारे इतर तारे पाहून दुर्गाबाईंना मोठ्या माणसांच्या गराड्यात सापडलेलं लहान मूल आठवते. त्या म्हणतात, "उत्तरेकडचा अगदी लहानसा ध्रुवसुद्धा नजरेत भरू लागतो. रात्रभर क्रमाक्रमाने ध्रुव, सप्तर्षी, शर्मिष्ठा, ध्रुवमत्स्य या मोठमोठ्या तारकापुंजांना आपल्याभोवती फिरायला लावतो. लहान बालकाभोवती मोठ्या माणसांचा गराडा पडला तरी मूल जसे त्यांच्याहून वेगळे पडते, त्याची शोभिवंत छबी जशी खुललेलीच राहते, तसेच या ध्रुवाच्या ताऱ्याचे

होते." (पृ. ६२)

लहान बालकाच्या वेगवेगळ्या अवस्थांचे लोभस दर्शन उपमा, उत्प्रेक्षा, रूपक या अलंकारांच्या आश्रयाने दुर्गाबाईंनी येथे घडवलेले आढळते. यातील बाल घनश्यामाचा उत्प्रेक्षा अलंकारातून होणारा आविष्कार भारतीय मनाला मोहून टाकणारा आहे.

इतर झाडे त्यांना अल्लड व तरूण वाटतात तसे पिंपळाचे केव्हाच वाटत नाही. श्रावणात आजुबाजूची सर्व झाडे गडद हिरव्या रंगाच्या पानांनी भरून गेलेली असतात. त्याच काळात पिंपळावर लाल पालवी येऊ लागते. दुर्गाबाई म्हणतात, "श्रावणात हिरव्यागार पर्णराजीत खरोखरीच ही लाल पताका मुद्दाम पाहिल्याशिवाय दिसत नाही, जशी वासंतिक पालवी दिसते, किंबहुना इतर भावंडांनी भरपूर लेवून मग जे उरले असेल ते आपण ल्यावे ही वडील भावाची वृत्ती या झाडाच्या उशीरा येणाऱ्या पालवीत दिसून येत नाही का?" (पृ. ४७) इथला कौटुंबिक जिव्हाळा हृद्य वाटतो.

निसर्गात प्रेम भावनेचा आविष्कारही दुर्गाबाईंना जाणवतो. त्या लिहितात, "आमच्या घराजवळ एक पिंपळाचे झाड आहे, आणि त्याच्यावर मधुमालतीची एक प्रचंड वेल चढली आहे. चारी बाजूंनी अगदी मध्यापर्यंत या झाडाला तिने वेढून टाकले आहे. चैत्रात ही मधुमालती गुलाबी गेंदांनी खच्चून भरली आहे. आता फुलायला आणखी जागा नाही, अशी दाटी पिंपळाच्या तांबूस पानांची आणि या गुच्छाची झाली आहे. तरूलतांच्या अलिंगनाची काव्यमय वर्णने मी पुष्कळ वाचली आहेत. पण मधुमालतीला आपल्या पल्लवांनी छातीशी घट्ट घट्ट कवळून धरणारा आणि लाजवट पालवीने आच्छादलेले आपले सुंदर मस्तक किंचित लववून निर्भर हास्याचे आणि कोमलतेचे प्रदर्शन करणारा हा पुराणवृक्ष पाहून माझी नजर येता जाता त्याच्यावर खिळून राहते." (पृ. ७) मुग्ध शृंगाराची - चेतनगुणोक्ती अलंकाराची इथली अभिव्यक्ती विलोभनीय वाटते.

दुर्गाबाईंनी आकाश आणि धरणी यांच्या प्रेमाचा असाच आविष्कार उत्प्रेक्षा अलंकाराच्या आश्रयाने केला आहे. त्या म्हणतात, "या दिवसात (पौषात) सूर्यप्रकाशाच्या कांबी सकाळच्या वेळी धुक्याच्या पसाऱ्यातून मार्ग आक्रमीत असताना जशा स्पष्ट व रमणीय दिसतात तशा धुके ओसंडलेल्या हंगामात दिसत नाहीत. सूर्य वर आला आणि धुके विरलेसे वाटले तरी झाडांच्यामधून जे उन्हाचे कवडसे, जमिनीवर वा घराच्या छतांमधून, झरोक्यांमधून भिंतीवर पडतात, ते

सारे या किरणांच्या शलाकांमधूनच पडलेले दिसतात. जणू काही हिवाळ्यात आपल्यापासून दूरदूर जाणाऱ्या धरणीला, आकाशाने धुक्याने लपेटून टाकली असता, आपल्या हातांनी चाचपडत, चाचपडत सूर्य स्पर्शीत असतो. तिचे आकाशाच्या मिठीत दडलेले मुख प्रकाशाकडे वळवीत असतो. अगदी नाजूक सुखावह असे त्याचे किरण अनुनयाची कला कशी असावी हे जणू काही प्रत्यक्ष दाखवीत असतात. (पृ. ९४)

अंगात आलेल्या माणसाचे, मनोभंग होऊन खांदे वाकलेल्या माणसाचे, तारूण्य ओसरलेल्या स्त्री-पुरूषांचे चेहरे यांचे दर्शन दुर्गाबाईंना झाडांमध्ये होते.

"आषाढात सोसाट्याच्या वेगाने वादळी वारे वाहत असताना, त्यातच पावसाच्या सरी थांबून कोसळत असताना, वाऱ्याच्या झोताबरोबर झाडे उलटसुलट हलत होती. त्या झाडांमधील माडाची झाडे झिंज्या पसरून, अंगात आलेल्या माणसासारखी बेभान होऊन संतप्त स्थितीत पिंगा घालताहेतशी वाटत होती असे त्यांनी म्हटले आहे." (पृ. ४१)

गुलमोहोराची दोन खुरटी झाडे आणि त्यांच्या खाली लोंबणाऱ्या फांद्याचा नूर दुर्गाबाईंना रडवा वाटतो. त्या लिहितात, "एकदा रस्त्याने जाताना मी अशीच दोन खुरटी गुलमोहोराची झाडे पाहिली. आजुबाजूची झाडे मस्त माजली होती. ती पाहून या झाडांचा तो रडवा नूर माझ्यावर चांगलाच परिणाम करता झाला. जाता येता मी त्या झाडांकडे नेहमी पाहते. पण प्रत्येक वेळी त्या झाडांचे दर्शन मला अधिकाधिक केविलवाणे व भकास वाटते. पाने गळली होती तेव्हा बाकीच्या झाडांच्या फांद्या काळ्या शाईने काढलेल्या सुंदर रेषाचित्राप्रमाणे आकाशाच्या पार्श्वभूमीवर शोभत होत्या. पण ही खुरटी झाडे? त्यांच्या फांद्या वरपासून खालपर्यंत मनोभंग होऊन खांदे वाकलेल्या माणसाच्या निर्जीव हातांप्रमाणे कशातरी खाली लोंबत होत्या. एकही डहाळी दुसरा भाव दाखवीत नव्हती....... संध्याकाळच्या वेळी वाढत्या अंधारात ही दोन झाडे पाहिली की मन अत्यंत उदास होते. क्वचित फुले धरली तरी त्यांचे ते हसणे भकास व भयाण वाटते." (पृ. १९)

माघातल्या "पर्णहीन झाडांवर, पानांवर बघाल तिथे धुळीचे थर जास्त जास्त साचत चालल्यामुळे एक प्रकारचा जडपणा आल्यासारखा वाटत आहे. तारूण्य गेल्यामुळे उताराला लागलेल्या स्त्रीपुरूषांच्या मुखावर येतात तसेच करूणभाव वनस्पतींवर उमटलेले दिसल्याचा भास होतो," (पृ. १०३) असे दुर्गाबाईंनी म्हटले आहे. याच महिन्यात झाडांची पाने वाळतात. ती पाहून झाडावर

मृत्युछाया पडली आहे असे दुर्गाबाईंना वाटते. त्या म्हणतात, “माघात वारा वाढतो, थंडी वाढते, उन्हही भासत नाही, तरी असते तेव्हा कडक, त्यावेळी पाने खरीखुरी जलद सुकतात. तपकिरी रंगाची मृत्युछाया झाडांवर बघावे तिथे स्थिर झाल्यासारखी वाटते.” (पृ. १०५)

गर्भच्छायेपासून मृत्युछायेपर्यंतच्या मानवी जीवनातल्या वेगवेगळ्या अवस्थांच्या आणि भावनांच्या अनुभूतीचे अत्यंत समरसतेने व काव्यात्म वृत्तीने केलेले प्रत्ययकारी वर्णन म्हणजे ‘ऋतुचक्रा’च्या शैलीचा एक मनोरम आविष्कार आहे.

(संदर्भ - या लेखातील पृष्ठांक पुढील प्रतीतील आहेत.
भागवत दुर्गा, ‘ऋतुचक्र’, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, १९७३ (चौ.आ.)

■

**२९/४१८ लोकमान्यनगर, पोस्ट ऑफिसच्या जवळ, पुणे ४११ ०३०.**

## खरा न्याय

जपानमधली एक गोष्ट. एक चोर एका श्रीमंत माणसाच्या घरात शिरला. घरात चोर शिरला आहे हे मालकाच्या लक्षात आले. चोराला पकडण्यासाठी त्याने एक युक्ती केली. त्याने पटकन राष्ट्रगीताची कॅसेट लावली. राष्ट्रगीताचे शब्द कानावर पडताच चोराने हातातला माल खाली टाकला. राष्ट्रगीताला मान देण्यासाठी तो ताठ उभा राहिला. तेवढ्या वेळात मालकाने पोलिसांना फोन केला. पोलीस आले. चोराला पकडून घेऊन गेले.

मात्र कोर्टातला निकाल अगदी वेगळा होता. राष्ट्रगीताचा मान राखणाऱ्या चोराला सोडून देण्यात आले आणि राष्ट्रगीताचा गैरवापर करणाऱ्या मालकाला मात्र शासन झाले.

■

**प्रेषक : माधुरी जोशी, पुणे**

## सबमिशन आणि समर्पण

नुकताच स्थापत्य विद्यालयातला विद्यार्थी स्वग्रामी जाण्यापूर्वी निरोप घेण्यासाठी मजकडे आला होता. तो म्हणाला, "परीक्षा झाली, सुट्टीही चालू झाली, परंतु सबमिशन घ्यायचे राहिले होते ते कालच पुरे केले. आता मोकळा झालो." स्थापत्य आणि वैद्यक शाखातील मुलेच अशी सबमिशन्स करत असतात. म्हणजे हा एक तांत्रिक, टेक्निकल शब्द झाला. एरवी आम्हा कारकून मंडळीना फक्त रिस्पेक्टफुली सबमिटेड, सविनय सादर हे शब्द परिचित.

मनात आले सबमिशन शब्दाला आणखी एक आध्यात्मिक अर्थ आहे - ईश्वराला म्हणा, गुरुला म्हणा संपूर्ण, हेतू न ठेवता सबमिशन, समर्पण करणे. (हे कठीण आहे हे मात्र खरे!) एकाच 'सबमिशन' शब्दाला असे तीन वेगळे अर्थ कसे काय? शंका सविनय सादर करतो.

■

**यशवंत गणेश जोशी, १८५२/१ घोंगडे गल्ली, पंढरपूर ४१३ ३०४**

सबमिशन शब्दाला वेगवेगळे अर्थ असल्यामुळे वाटले तरी ही एकाच सूत्राने बांधलेली पण संदर्भामुळे वेगळी ठरणारी अर्थांतरे आहेत. मूळ लॅटिनमधला धात्वर्थ खाली पाठवणे असा आहे. लक्षणेने स्वतःला किंवा स्वतःच्या कृतीला, उक्तीला विनयाने दुसऱ्यापुढे खालच्या पातळीवर ठेवणे. विद्यार्थी स्वतः केलेल्या पाहणीला, प्रयोगाला शिक्षकांपुढे परीक्षणासाठी ठेवतो, कारकून वरिष्ठापुढे आपले म्हणणे विचारासाठी ठेवतो, वकील न्यायाधिशापुढे आपला युक्तिवाद विचारासाठी ठेवतो, वादी-प्रतिवादी लवादापुढे आपसातील वाद निर्णयासाठी ठेवतात, शिष्य गुरूपुढे स्वतःलाच अनुग्रहासाठी ठेवतो. ही सगळी सबमिशनचीच उदाहरणे. मराठीमध्ये मात्र कमी अधिक वजनानुसार प्रतिवृत्त सादर करणे, सविनय मांडणे, वाद शरण जाऊन सादर करणे, स्वतःला समर्पण करणे किंवा स्वतः शरण जाणे असे वेगवेगळे शब्दप्रयोग करावे लागतात.

दोन भाषांमध्ये असे फरक पुष्कळदा दिसतात. मराठी 'लवकर' (थोड्या वेळात) साठी इंग्रजीत soon, soon after, quickly असे पर्यायी अनुवाद निवडावे लागतात.

■

**अशोक रा. केळकर**

# देवनागरी अक्षरे - जोडाक्षरे आणि संधिनियम

ना. शं. आपटे

"देवनागरी अक्षरे - पुनर्विचार, पुनर्रचना" या वर्ष २० अंक १ मधील माझ्या लेखाचा प्रा. मनोहर राईलकरांनी घेतलेला समाचार वाचला. अक्षररूपांच्या त्यांनी दिलेल्या मोठ्या संख्येने मी दिलेल्या त्या विशिष्ट कारणाला बळकटी आली आहे. केवळ ५०/५२ अक्षरचिन्हांनी होऊ शकणाऱ्या कामासाठी ५००० अक्षररूपे वापरण्याला बुद्धिमत्ता म्हणता येईल?

माणसाने यंत्रे, तंत्रे शोधली, ती शारीरिक कष्ट हलके/कमी करण्यासाठी, त्याच कष्टांनी अधिक किंवा चांगली कामे करण्यासाठी. त्यांचे गुलाम होण्यासाठी किंवा स्वतः हातांनी, पायांनी, मन किंवा बुद्धीने अपंग/अधू होण्यासाठी नव्हेच. कॅलक्युलेटर/गणनयंत्र हाताशी आल्याने मोठ्या दुकानातील विक्रेत्याला साधे गुणाकार, बेरजा करण्याचा कंटाळा येतो. माझी नातवंडे पाढे पाठ करण्याचा, गुणाकार, भागाकार, बेरजा-वजाबाक्या, त्रैराशिके/पंचराशिके करण्याचा कंटाळा करतात. दुचाक्या, चारचाक्या आल्याने आम्ही चालण्याच्या बाबतीत पंगू व्हायला लागलो आहोत. कितीकिती उदाहरणे द्यावीत? रविवार-'लोकसत्ता'-"लोकरंग" मधील "भाषा-आपली सर्वांचीच" या प्रा. अविनाश बिनीवाले यांच्या लेखमालेतील (राज्य मराठी विकास संस्थेने याचे पुस्तक प्रसिद्ध केले आहे.) एका लेखाचा मथळा आहे - "हस्ताक्षर, म्हणजे हो काय, बाबा?"

माझ्या देवनागरी अक्षररचनेच्या पुनर्विचार, पुनर्रचनेच्या मूलाधारांना भक्कम आक्षेप असल्यास, त्यांचे स्वागतच आहे.

**जोडाक्षरे :-** तथाकथित जोडाक्षरात सर्वात आधी असलेला रेफ पुढची व्यंजनध्वनिचिन्हे ओलांडून शेवटच्या अख्ख्या व्यंजनाक्षराच्या डोक्यावर, तोसुद्धा वरील वेलांटी/मात्रा/मात्रांच्या नंतर, जातो हे उच्चार - उदा. पूर्वी. विपरीतच आहे. अपूर्ण उच्चाराचे व्यंजनध्वनिचिन्ह प्रचलित गृहीतकाप्रमाणे स्वराच्या, तर माझ्या प्रतिपादनाप्रमाणे उच्चारपूरक शक्तीच्या, काना चिन्हाबरोबर असले की त्याचे पूर्ण

उच्चाराचे अख्खे अक्षर बनते. म्हणूनच, आधीची अपूर्ण उच्चाराची व्यंजन-ध्वनीचिन्हे शेवटच्या पूर्ण उच्चाराच्या अख्ख्या अक्षराच्या कान्याला वरूनखाली जोडल्याने त्यांचे जोडाक्षर होत नाहीच, तर त्या प्रत्येकाचे पूर्ण उच्चाराचे अख्खे अक्षर बनते. उदा. कार्य. धडाच्या मध्ये, डोक्यावर, खाली काना असलेल्या व्यंजनाक्षराला खाली अख्खे अक्षरे जोडल्याने वरचे व्यंजनाक्षर अर्धे होत नाही, तर ते अख्खेच राहते. अक्कल, मठ्ठ ही असली जोडाक्षरे नव्हतेच. असल्या तथाकथित जोडाक्षरांच्या पुरस्कर्त्यांनी या मूलभूत मुद्याचा गंभीर विचार करावा.

अ/आ अधिक इ/ई आणि अ/आ अधिक उ/ऊ या स्वराक्षरांचे जोडउच्चार दाखवण्यासाठी अनुक्रमे ए आणि ओ ही अक्षरे सांगणारे प्रचलित संधिनियम चुकीचे आहेत.

प्रत्यक्षात/वास्तवात हे जोड-उच्चार अनुक्रमे ऐ आणि औ असेच होतात. प्रसिद्ध प्राच्यविद्या आणि इतिहास संशोधक कै. सदाशिव आठवले यांनी त्यांच्या "महाभारत, ऐका भाऊबंदांनो तुमची कहाणी' या पुस्तकात सूत-उवाच साठी प्रचलित सूतोवाच ऐवजी सूतौवाच शब्द वापरला आहे.

सबब, प्रचलित संधिनियम सुधारून ते वास्तविक केले पाहिजेत.

अपूर्ण उच्चारवाल्या एका व्यंजनध्वनीचा किंवा अनेक व्यंजनध्वनींचा पूर्ण उच्चारवाल्या पुढच्या किंवा शेवटच्या व्यंजनाक्षराबरोबर तुटक आणि (एकसमयावच्छेदे) जोड उच्चार दाखवणाऱ्या अक्षरांना तोडाक्षरे आणि जोडाक्षरे म्हणतात. स्वतंत्र जोडाक्षरांच्या पुरस्कर्त्यांचा आग्रह आहे की ज्यांत अशी आधीची ध्वनिचिन्हे उच्चारक्रमानुसार पूर्ण उच्चारवाल्या पुढच्या किंवा शेवटच्या व्यंजनाक्षराच्या कान्याला किंवा दण्डाला वरूनखाली जोडली जातात ते स्वतंत्र जोडाक्षर होते. त्याला साघात जोडाक्षर म्हणतात.

पण, व्यंजनाक्षरांच्या प्रचलित वेगवेगळया प्रकारच्या रचनांमुळे असे जोडाक्षर लिहिणे अशक्य आहे. क्ष आणि ज्ञ या स्वतंत्र जोडाक्षरांत त्यांची क्‌ष आणि ज्‌ञ किंवा ज्‌ न्‌ य किंवा द्‌ न्‌ य ही घटक ध्वनिचिन्हे नाहीत. ती आहेत असे सांगावे लागते. इतरत्र ही ध्वनिचिन्हे उच्चारक्रम विपरीत दिसतात, भासतात आणि असतात. मध्यावर आणि डोक्यावर तसेच खाली अख्खा काना किंवा कानातुकडे असलेली व्यंजनाक्षरे आधी असल्यास ती अशा जोडाक्षरांत अर्धी करता येत नाहीत. म्हणून वर्णविपर्यास मुद्दाम केला जातो. उदा. ब्रह्‌म चा ब्रम्ह होतो. एका शितावरून भाताची परीक्षा होते. उत्‌/द्‌ अधिक वहन = उद्वहन मधील "द्व"

हे साघात जोडाक्षर आहे का? मुख्य किंवा कळीचा मुद्दा म्हणजे कोणतेही ध्वनिचिन्ह कानाचिन्हाला जोडले गेल्याबरोबर त्या दोघांचे मिळून पूर्ण उच्चाराचे अख्खे अक्षर बनते.

तोडाक्षराच्या विरूद्ध स्वतंत्र जोडाक्षराच्या पुरस्कर्त्यांनी वरील मुद्दे लक्षात घेऊन स्वतःचा आग्रह सोडावा. या दोघात केवळ निराघात आणि साघात हाच भेद आहे. आघात चिन्ह जोडले की जोडाक्षर स्पष्ट होते. 'भाषा आणि जीवन' २०:१ मधील माझ्या "देवनागरी अक्षरे-पुनर्विचार, पुनर्रचना" लेखात याचसाठी मी आघात चिन्ह सुचवले आहे.

■

आपटे निवास, लोटे परशुराम, खेड रत्नागिरी ४१५ ७२२.

परिषदवार्ता

## अभिनंदन

मराठी अभ्यास परिषदेच्या एक संस्थापक सदस्या डॉ. मॅक्सिन बर्नसन यांना त्यांच्या ग्रामीण भागातील वैशिष्ट्यपूर्ण अशा शैक्षणिक कार्याबद्दल आलोडी चेतना विकास संस्थेने (वर्धा) डॉ. पद्मजाराणी बंग स्मृतीनिमित्त राष्ट्रीय पुरस्कार जाहीर केला आहे. मानपत्र व एक्कावन्न हजार रुपये असे या पुरस्काराचे स्वरूप आहे. परिषदेतर्फे त्यांचे मनःपूर्वक अभिनंदन!

■

भाषावार्ता

## 'बोलका शब्दकोश'

नाशिक येथील एक संगणकतज्ज्ञ श्री. सुनील खांडबहाले यांनी सीडी रॉमवर इंग्रजी-मराठी बोलका शब्दकोश तयार केला आहे. पन्नास हजारांहून अधिक इंग्रजी शब्दांचे स्पेलिंग, शास्त्रशुद्ध उच्चार, अर्थछटा, समानार्थ, विरूद्धार्थ, वाक्यात उपयोग, व्याकरण व व्युत्पत्ती यांसह मराठी अर्थ ऐकण्याची सोय असल्याने हा कोश अंधांसाठी वरदानच ठरणार आहे. अधिक माहितीसाठी : www.khandbale.com.

■

**(महाराष्ट्र टाइम्स, दि. ७.११.०२ मधील वृत्ताच्या आधारे.)**

# परिषदवार्ता : महाबँक भाषाविषयक लेखन पुरस्कार २००२

मराठी अभ्यास परिषद आणि बँक ऑफ महाराष्ट्र यांच्या संयुक्त विद्यमाने दिला जाणारा महाबँक भाषाविषयक लेखनपुरस्कार २००२ श्री. अरूण फडके यांच्या 'मराठी लेखनकोश' (केशव भिकाजी ढवळे प्रकाशन, मुंबई, २००१) या ग्रंथाला देण्यात आला. पारितोषिक निवडसमितीत डॉ. गं.ना. जोगळेकर (प्रथम फेरीसाठी), डॉ. विद्यागौरी टिळक आणि प्रा. प्र.ना. परांजपे (निमंत्रक) यांनी काम पाहिले.

पुरस्कार वितरण समारंभ दि. १५ डिसेंबर २००२ला महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या पटवर्धन सभागृहात सायंकाळी ५.३० वाजता डॉ. अशोक केळकरांच्या अध्यक्षतेखाली साजरा झाला. प्रमुख पाहुणे या नात्याने ज्येष्ठ कवी व समीक्षक वसंत आबाजी डहाके उपस्थित होते. परिषदेच्या कार्यवाह नीलिमा गुंडी यांनी आपल्या प्रास्ताविक भाषणात संस्थेच्या उपक्रमांचा परिचय करून दिला. परीक्षकांच्यावतीने डॉ. विद्यागौरी टिळक यांनी आपल्या भाषणात कोशाचे महत्त्व स्पष्ट केले. मराठीत अशा प्रकारच्या कोशाची उणीव होती. ती भरून निघाल्याबद्दल त्यांनी समाधान व्यक्त केले. प्रा. डहाके यांच्या हस्ते श्री. अरूण फडके यांना रु. ५,०००/- आणि प्रमाणपत्र देण्यात आले. श्री. फडके यांनी कोश लेखनामागील आपली प्रेरणा व्यावसायिक गरजेतून कशी निर्माण झाली, ते आपल्या मनोगतात सांगितले. त्यांनी मराठी वाक्यलेखनकोश तयार करण्याचा संकल्पही व्यक्त केला. प्रा. डहाके यांनी "भाषेच्या संवर्धनात कोशवाङ्मयाचे महत्त्व" या विषयावर आपले अभ्यासपूर्ण विचार मांडले. मराठी भाषेचा व्यवहार योग्य रीतीने पुढे नेण्यासाठी ज्ञानात्मक लेखनाची गरज त्यांनी प्रतिपादन केली. त्यासाठी कोशवाङ्मयाची निर्मिती कशी आवश्यक आहे, हे त्यांनी सोदाहरण पटवून दिले. त्यांच्या मते कोश तयार करताना आत्मभानाबरोबरच विश्वभानाचीही गरज असते.

डॉ. केळकरांनी अध्यक्षीय भाषणात विविध भाषांमधील कोशकार्याचे दाखले देऊन मराठी कोशकर्त्यांपुढे नवी आव्हाने उभी केली. बँक ऑफ महाराष्ट्रच्यावतीने श्री. श्याम भुर्के यांनी आभार मानताना उत्तम मराठी लेखनासाठी बँक आर्थिक पाठबळ देण्यास तयार आहे, असे आश्वासन दिले. या कार्यक्रमाला भाषाप्रेमी, ज्येष्ठ अभ्यासक व रसिक मंडळी यांची उपस्थिती होती.

■

# उपजाती

**मनोहर राईलकर**

इंद्रवज्रा वृत्ताचे गण त, त, ज, ग, ग असे आहेत. आणि उपेंद्रवज्राचे ज,त,ज,ग,ग असे आहेत. म्हणजे दोघांच्या पहिल्या फक्त गणात फरक आहे. पुढं, त-गण (गगल) आणि ज-गण (लगल) यांचं निरीक्षण केलं असता, त-गणातलं पहिलं अक्षर गुरू तर ज-गणातलं पहिलं अक्षर लघू आहे, इतकाच फरक आहे. म्हणजेच ह्या दोन्ही मुद्द्यांचा एकत्र विचार करता इंद्रवज्राचं पहिलं अक्षर गुरू आणि उपेंद्रवज्राचं लघू, इतका फरक सोडला, तर दोन्ही वृत्तांत इतरत्र काहीही फरक नाही, असं म्हणता येईल.

ह्या दोन वृत्तांचं मिश्रण करून (म्हणजे चार चरणांतले काही इंद्रवज्राचे तर बाकीचे उपेंद्रवज्राचे) मिळालेल्या वृत्ताला उपजाती म्हणतात, असं आपटे कोशात दिलं आहे. आणि उपजातींचे एकूण १४ प्रकार आहेत, असंही पुढं म्हटलं आहे. (आपटे यांचा संस्कृत-इंग्रजी कोश, दुसरी आवृत्ती १९७०चे पुनर्मुद्रण १९९९ - पृ. ६५०.) माझ्या मनात प्रश्न आले, आपटे यांनी १४ प्रकार आहेत असं का म्हटलं असावं? त्यांचं बरोबर असेल का? आणि असलं तर ते प्रकार कोणते? त्यांनी प्रत्यक्षात प्रकार का दिले नाहीत?

इंद्रवज्रा आणि उपेंद्रवज्रा ह्यांच्यापासून उपजाती मिळवायच्या याचा अर्थ असा. श्लोकाच्या चार चरणांपैकी काही इंद्रवज्रात आणि बाकीच्या उपेंद्रवज्रात ठेवायच्या. तसं असलं की संबंधित पद्याच्या वृत्ताला उपजाति असं सर्वसाधारणतः म्हणतात. येथे मी सर्वसाधारणतः असं म्हणण्याचं कारण, त्याच पानावर आपटे पुढं म्हणतात, उपजातीत आणखीही काही वृत्तांचं मिश्रण केलं जातं. पण कोणत्या वृत्तांचं ते त्यांनी दिलेलं नाही. म्हणून त्यांचा विचार इथं करणं कठिण आहे. तेव्हा फक्त वरील दोन प्रकारांच्या मिश्रणातून चौदा प्रकार का मिळतात, आणि ते कोणते, इतकंच आपण पाहू. हे मी अंशतः गणितानं दाखवणार असलो तरी त्यातलं गणित फारसं कठिण नाही. तेव्हा जिज्ञासूंनी दचकण्याचं कारण नाही.

अशा प्रकारचे प्रश्न सोडवताना गणितात दोन मार्गांचा अवलंब केला जातो. (१) आपलं म्हणणं सत्य असल्याचं फक्त अस्तित्व दाखवून प्रस्थापित करणं आणि








(२) प्रत्यक्ष रचना देणं, किंवा रचना करण्याचा मार्ग सुचवणं. गणितातही पहिला मार्ग कनिष्ठ समजला जातो. आणि दुसऱ्या मार्गाला अधिक श्रेय दिलं जातं. आपण त्याला गमतीनं अनुक्रमे हीन मार्ग आणि महामार्ग म्हणू शकतो. कारण प्रत्यक्ष रचना मिळत असल्यामुळं दुसरा मार्ग व्यावहारिक दृष्ट्या अधिक उपयुक्त ठरतो. शिवाय, हीन मार्गात मिळणारं अस्तित्व हे उत्तर मिळतंच. मग हीन मार्गाची जरुरीच काय असं काहींच्या मनात येईल. त्याचं असं उत्तर आहे की, काही प्रसंगांत महामार्ग प्रत्यक्षात अयशस्वी ठरतात. मग निदान अस्तित्व तरी प्रस्थापित करता आलं, तर तेही नसे थोडके!

(१) हीन मार्ग - श्लोकात चार चरण आहेत. त्यांपैकी कोणत्याही चरणाचं पहिलं अक्षर गुरू किंवा लघू, असे दोनच प्रकार आहेत. म्हणून २ गुणिले २ गुणिले २ गुणिले २ मिळून १६ प्रकार होतात. पैकी, सर्व चरणांतली पहिली अक्षरं गुरू असतील तर इंद्रवज्रा वृत्त मिळतं आणि सर्व चरणांतील पहिली अक्षरं लघू असतील तर उपेंद्रवज्रा वृत्त मिळतं. ते दोन प्रकार वगळले की राहिलेले १४ प्रकार उपजातींचे राहतात. म्हणजे आपटे यांचा दावा सत्य आहे, असं म्हणता येईल. आपटे यांनी हे कसं केलं ते मला माहीत नाही. पण, त्यांचं म्हणणं बरोबर आहे, हे गणितानं आपण निर्विवादपण प्रस्थापित केलं आहे.

(२) महामार्ग - सर्व चरण एकसारखे असलेले दोन प्रकार वर पाहिले. ते सोडले तर, एका तरी चरणात पहिलं अक्षर गुरू आणि एका तरी चरणात पहिलं अक्षर लघू. अधिकही - म्हणजे प्रत्येकी दोन दोन - असायला हरकत नाही. तसे किती किती प्रकार होतील आणि ते कोणते? असा प्रश्न स्वाभाविकच वाचकांच्या मनात येईल. त्याकरता प्रथम, पुढील तीन स्थूल पर्याय करू - (अ) फक्त एका चरणात पहिलं अक्षर गुरू आणि उरलेल्या तीन चरणांत लघू. (आ) फक्त एका चरणात पहिलं अक्षर लघू आणि उरलेल्या तीन चरणांत गुरू. (इ) कोणत्या तरी दोन चरणांत पहिलं अक्षर गुरू आणि उरलेल्या दोन चरणांत लघू. यापेक्षा वेगळे प्रकार संभवत नाहीत. आता ह्यांचा तपशिलानं विचार करून प्रत्येकी किती प्रकार मिळतात ते ठरवू.

(अ) ज्याचं पहिलं अक्षर गुरू आहे असा चरण पहिला, किंवा दुसरा, किंवा तिसरा, किंवा चौथा असेल. म्हणून ह्या पद्धतीच्या उपजातींची संख्या ४ झाली. थोडक्यात ते असे लिहू गललल, लगलल, ललगल, लललग. (इथं प्रत्येक अक्षर संबंधित चरणातलं पहिलं अक्षर कसं आहे ते दाखवतं. उदा. गललल चा अर्थ,

पहिल्या चरणातलं पहिलं अक्षर गुरू आणि दुसऱ्या, तिसऱ्या व चौथ्या चरणांतलं पहिलं अक्षर लघू. एरवी गण दाखवले जातात, तसं इथं अपेक्षित नाही.)

(आ) त्याचप्रमाणं एक अक्षर लघू असणारा चरण पहिला, किंवा दुसरा, किंवा तिसरा, किंवा चौथा असू शकेल. तेव्हा इथंही ४ प्रकार होतात - लगगग, गलगग, गगलग, गगगल.

(इ) ज्यांच्या दोन चरणांत पहिलं अक्षर गुरू आणि दोन चरणांत लघू असेल असे ६ प्रकार संभवतात. ते पुढीलप्रमाणं गगलल, गलगल, गललग, लगगल, लगलग, ललगग.

उपजातीच्या ह्या तिघा प्रकारांची बेरीज १४ होते. याप्रमाणं आपटे यांचं म्हणणं बरोबर असल्याचं आपण गणितानं सिद्ध केले. आणि ते प्रकारही स्पष्टपणे सांगितले.

■

**'मृण्मयी', ५६ जेधे नगर, बिबवेवाडी, पुणे ४११ ०३७.**












१. **'मराठी अभ्यास परिषद पत्रिका : भाषा आणि जीवन'ची वर्गणी :**

वर्गणी भरण्यासाठी पत्रिकेचे वर्ष जानेवारी ते डिसेंबर असे आहे. या त्रैमासिकाचे वर्षात चार अंक निघतात. १ जानेवारी, २००२ पासून वर्गणीचे दर पुढीलप्रमाणे आहेत.

वार्षिक वर्गणी - संस्थेला रु. १२५ फक्त, पंचवार्षिक वर्गणी रु. ५५० फक्त
व्यक्तीला रु. १०० फक्त, पंचवार्षिक वर्गणी रु. ४५० फक्त

२. **आजीव वर्गणी :**

मराठी अभ्यास परिषदेची आजीव सदस्यत्व वर्गणी रु. १०००/-. पूर्वीच्या आजीव सदस्यांनी वर्गणीतील वाढीव रक्कम रु. ४००/- भरावी, असे परिषदेतर्फे आवाहन आहे.

३. **पैसे भरण्याबद्दल सूचना :**

वर्गणी प्रत्यक्ष रोखीने किंवा धनादेशाने देता येईल. कृपया मनिऑर्डर पाठवू नये. धनादेश 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने काढावा. धनादेश पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास रकमेत ५ रुपये वटणावळ अधिक घालावी. धनादेशासोबत आपले नाव, पत्ता, रक्कम, कोणत्या वर्षासाठी वर्गणी ते अवश्य लिहावे. पावती दिली जाईल. नमुना अंक मिळाला असल्यास कोणता अंक याचा उल्लेख करावा.

**वर्गणी व तत्संबंधी पत्रव्यवहाराचा पत्ता :** नीलिमा गुंडी, ३, अन्नपूर्णा, १२५९, शुक्रवार पेठ, सुभाषनगर गल्ली क्र. ५, वाडिया हॉस्पिटलसमोर, पुणे ४११ ००२. दू. क्र. ४४८६०१५

३. **मागील अंक :**

'भाषा आणि जीवन' हे त्रैमासिक १९८३ पासून प्रसिद्ध होत आहे. (१९८३ या वर्षी मात्र दोनच अंक निघाले आहेत.) काही अंकांचा अपवाद वगळता सर्व वर्षांचे अंक उपलब्ध आहेत. १९८३ ते १९९० पर्यंतच्या प्रत्येक अंकाची किंमत रु. १०/-, १९९१ पासून पुढील वर्षातील प्रत्येक सुट्या अंकाची किंमत रु. २०/- आणि २००२ पासून प्रत्येक सुट्या अंकाची किंमत रु. २५/-.

५. **प्रकाशने :**

या त्रैमासिकातील निवडक लेखांचे संपादित पुस्तक 'निवडक भाषा आणि जीवन' (किंमत रु. २००) परिषदेच्या कार्यवाहांकडे अथवा मेहता पब्लिशिंग हाउसमध्ये मिळू शकेल. तसेच 'भाषांतरमीमांसा' हे पुस्तकही कार्यवाहांकडे अथवा प्रतिमा प्रकाशनाकडे उपलब्ध आहे.

६. **जाहिरातींसाठी दर :**

पूर्ण पान रु. ७५०/- , अर्धेपान रु. ४००/-, पाव पान रु. २५०/-, शुभेच्छा सूचना रु. १००/-, आवरण पृष्ठ तीन / चार रु. ८००/- जाहिरात मराठीत असल्यास उत्तम, हिंदीत, इंग्रजीत असल्यास चालेल.

